# एक नमुनेदार विद्यार्थी !

लेखक,

कृष्णराव भाऊराव बावर.

राजशक २५० ] किंमत ६ आणे. [ नोव्हेंबर १९२३

ॐ

# एक नमुनेदार विद्यार्थी.



खोली लोटून स्वच्छ करणें, ही माझी कॉलेजची प्रवेश परीक्षा होय'

बुकर टी. वाशिंग्टन.


लेखकः—

**श्री कृष्णराव भाऊराव बाबर,**

हेडमास्तर मराठी मुलांची शाळा कालें, जि० सातारा.




राजशक २५० ]     किंमत ६ आणे     [ नोव्हेंबर १९२३

# अर्पणपत्रिका.



गुरुवर्य रा० रा० विठ्ठलराव रामजी शिंदे, बी. ए.,
यांनीं अत्यंत स्वार्थत्यागपूर्वक हिंदुस्थानांतील
निग्रो ( अस्पृश्य ) लोकांसाठीं जी बहु-
मोल कामगिरी केली आहे, तिज-
बद्दल हें पुस्तक त्यांचे परवा-
नगीनें त्यांना परमादर-
पूर्वक अर्पण करीत
आहे.

लेखक.

# लेखकाचे दोन शब्द.

——:०:——

अलीकडे विद्यार्थ्यांत स्वावलंबन कमी दिसून येऊं लागलें आहे व श्रम कर-याची आवड त्यांच्यांतून नाहींशी होत चालली आहे, ही स्थिति नाहींशी व्हावी म्हणून प्रस्तुत पुस्तक लिहिलें आहे. प्रस्तुत पुस्तक हें एका उत्तम विद्यार्थ्याचें चरित्र आहे व हा चरित्रनायक सर्व जगांतील विद्यार्थ्यांना मार्गदर्शक होण्यासारखा आहे.

प्रस्तुत पुस्तक लिहिण्याच्या कामीं माझे मि० श्री. शेख मोहिमुद्दीन अहमद हेडमास्तर कलेढोण मुलांची शाळा जि० सातारा यांची सर्व परीनें मदत झाली आहे; आणि मे० रा० सा० कृष्णाजी शंकर ऊर्फ बाबासाहेब दीक्षित, बी. ए., डे. ए. इन्स्पेक्टर जि० सातारा यांनीं प्रस्तावना लिहून व प्रकाशनाचे कामीं पूर्ण सहाय्य देऊन मदत केली आहे, याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. मे० रा. सा. बाबासाहेब दीक्षित यांचे सक्रिय सहानुभूतिमुळेंच प्रस्तुत पुस्तक मला बालवाचकांचे हातीं देतां आलें आहे.

पुस्तक चांगल्या रीतीनें छापून देण्याचे कामीं ' हनुमान प्रिंटिंग प्रेस,पुणें ' या छापखान्याचे मालक श्री. लक्ष्मणराव भाऊराव कोकाटे यांनीं पूर्ण साहाय्य केलें व माझे मि० श्री. मारुतराव गबाजी शेटे संपादक ' शिक्षक ' यांनीं प्रकाशनाचे कामीं सर्वतोपरी मदत केली याबद्दल मी त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. इत्यलम् !

ता० १–११–२३ इ० राजशक २५०<br>बागणी, जि० सातारा. } **कृष्णराव भाऊराव बाबर.**



# अनुक्रमणिका.







**बालवाचकांस सूचना**:—रा. रा. नागेशराव वासुदेवराव गुणाजी बी. ए. एल् ए. बी वकील बेळगांव यांनीं डॉ० बुकर टी. वाशिंग्टन यांनीं स्वतः लिहिलेल्या आत्मचरित्राचें आत्मोद्धार या नांवाचें एक पुस्तक भाषांतरित केलेलें आहे, तें बरेंच मोठें आहे. या पुस्तकाचा प्रस्तुत पुस्तक लिहिण्यास बराच उपयोग झाला आहे. जिज्ञासु बालवाचकांनीं हें पुस्तक अवश्य वाचावें.

———

# ॥ प्रस्तावना. ॥



आमच्या राष्ट्राची नाना प्रकारांनी अवनति झालेली आहे. ती अवनति थांबून आमचें राष्ट्र उन्नतीच्या मार्गाप्रत कसें येईल याविषयीं आज प्रत्येक सुशिक्षिताचे मनास आंच लागली आहे. राष्ट्रोद्धाराविषयीं भिन्नभिन्न मतांच्या लोकांचें एका गोष्टीविषयीं मात्र ऐकमत्य दिसतें कीं, आमच्या भावी पिढींत जे गुण आम्हीं आणूं त्यावरच आमच्या आशेचा सर्व भर आहे. आमच्या समाजाच्या उणीवा काय काय आहेत हें प्रत्येक विचारशील माणसाला तीव्रतेनें भासूं लागलें आहे. त्या उणीवा नाहींशा होण्यास एकच मार्ग म्हणजे त्यांचा भावी पिढींत मुळींच प्रवेश होऊं न देणें हा होय. आमची भावी पिढी जितकी जोमदार, कर्तृत्ववान् व स्वावलंबी होईल तितका आमचा उत्कर्ष सन्निध आला म्हणावयाचा. तर मग विद्यार्थ्यांत हे गुण कसे उत्पन्न होतील याची आच ज्यांचे मनास लागली आहे असे जितके शिक्षक आमचे शाळांतून असतील तितके आज हवे आहेत असें साहजीक झालें. आणि म्हणूनच रा. कृष्णराव भाऊराव बाबर यांनीं विद्यार्थ्यांकरितां हा जो अल्पसा प्रयत्न केला आहे तो अत्यंत स्पृहणीय आहे. रा. बाबर यांच्यासारख्या स्वतःच्या शिष्यांच्या मानसिक कर्तबगारीविषयीं दिवसरात्र झटणाऱ्या शिक्षकांचें कौतुक करणं स्वकर्तव्य समजून प्रस्तुत पुस्तकास छोटीशी प्रस्तावना लिहिण्याचें मीं कबूल केलें.

मी माझें नशीब उदयास आणीन, माझें नशीब उदयास आणण्याचें सामर्थ्य माझेच आंगीं आहे, मीच स्वतःस मदत

केली पाहिजे, असे विचार दहांपैकीं एका व्यक्तीच्या मनांत जरी वसत असले तरी ती व्यक्ति आमच्या राष्ट्राच्या अवनतीस खास अवरोध करील. प्रत्येक तरुणास विचारलें तर ता ह्मणतो काय करावें मला संधीच येत नाहीं; अनुकूळ स्थिति असती तर मी केव्हांच पुढें आलों असतों; मला कोणत्याही तऱ्हेनें प्रस्तुतची स्थिति आशाजनक वाटत नाहीं; मला हवी ती मदत आमचे समाजाकडून मिळत नाहीं; आमच्या राष्ट्रांत आज हजारों तरुण माणसें अशा विचारांनीं गोंधळून जाऊन स्वकर्तव्यच्युत होत आहेत. पण त्यांस असें समजत नाहीं कीं, सुसंधि ही आपणच आणावयाची असते. ती दुसऱ्यानें हुडकून द्यावयाची नसते. स्वावलंबन, स्वतःचा मार्ग स्वतःच शोधून काढणें ह्या संवयी आमच्या आंगीं बऱ्याच अंशानें नाहींत असें दुःखानें म्हणावें लागतें.

**आपण करतों ती हरएक गोष्ट आनंदानें, उत्साहानें व शक्य तितक्या उत्तम रतिीनें करण्याची हाव आमचे तरुण पिढींत येईल तर त्यांस सुसंधी कोठें आहे हें दुसऱ्यास विचारण्याचें कारण पडणार नाहीं.** आळस, कर्तव्य शून्यता व लोकांविषयीं अनास्था ह्या दुर्गुणामुळें स्वतःच्या आयुष्यक्रमा-भोंवतीं एक घातुक जाळें कितीतरी तरुण बनवीत आहेत, शुल्लक गोष्टीसही जपावें. वेळेचा क्षणही वाया जातां कामा नये, स्वतः-च्या शक्तीची हरघडी जाणीव असावी, असल्या विचारांची शिदोरी जर आमचे विद्यार्थ्यांस बांधून दिली तर आमची भावी पिढी स्वावलंबन-प्रिय होईल. असले विचार रा. बाबर यांच्या आंगीं बाणत असल्यामुळें विद्यार्थ्यांस मी कोणत्या रीतीनें साहाय्य करूं शकेन असा त्यांस ध्यास लागला आहे, हें आज

दोन वर्षें त्यांचा माझा परिचय झाला तेंव्हांपासून मला माहीत आहे. अर्थातच रा. बाबर यांच्या या निदिध्यासामुळें ' बुकर टी. वाशिंग्टनचें चरित्र प्राथमिक शाळांतून विद्यार्थ्यांस झेपेल अशा रीतीनें' त्याचें पुढें मांडणें हें साहजिकच त्यांचें मनात आलें व त्याचें दृश्यस्वरूप वाचकांपुढें येत आहे. याबद्दल रा. बाबर यांचें मी मन:पूर्वक अभिनंदन करतों.

स्वत:चे विचार कृतींत कसे आणतां येतील ही ह्मण रा. बाबर यांच्यांत विशेष आहे. ते या जिल्यांत जेथें जेथें शिक्षक होते तेथें तेथें आपले विद्यार्थी स्वावलंबी कसे होतील तें प्रत्यक्ष रीतीनें जगापुढें मांडण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. चितळी ता० खटाव येथें ते शिक्षक असतांना शाळेची शाकारणी, जमीनी करणें, रंगसफेती करणें याकरतां पैसे मंजूर करण्यांत आले, पण ते पैसे मजुरांस देऊन टाकून त्यांचेकडून पावती घेऊन ती अधिकाऱ्यांकडे पाठविली कीं, आपलें कर्तव्य आटोपलें असें रा. बाबर यांचे मनांत मुळींच आलें नाहीं. आमच्या पिढींत कोणते गुण आतां अवश्य आले पाहिजेत, ते आले नाहींत तर आमचें राष्ट्र ताबडतोब अधोगतीचे मार्गास लागेल ह्या विचारांचा रा. बाबर जेथें जातात तेथें विनिमय करीत असल्यामुळें चितळीचे पालक शाळेसंबंधीं वरील नमूद केलेलें काम विद्यार्थ्यांकडून करवून घ्यावें या मताचे ताबडतोब बनले. अर्थातच रिपेरीस आलेल्या पैशांचें मुलांस पारितोषकें देण्यांत व तद्द्वारा चितळीच्या शाळेंतील बाल—वाचनालयास भर घालणें यांत रूपांतर झालें हें निराळें सांगणें नकोच. सातारा जिल्ह्याच्या कलेक्टरसाहेबांनीं ही गोष्ट जेव्हां ऐकिली, तेव्हां नंतर लागलीच भरलेल्या जिल्हादरबारांत ह्या गोष्टीचा उल्लेख केल्या-

वांचून त्यांस राहवेना ! प्रस्तुत प्रयत्न रा. बाबर यांचे हातून किती उत्तम वठला असला पाहिजे हें आतां मी निराळें सांगणें नको.

बुकर टी. वाशिंग्टनच्या चरित्रापासून लहान मुलांनीं काय शिकावयाचें तें मी येथें सांगत बसून वाचकांचा वेळ घेत नाहीं. मुलांनीं हें पुस्तक वाचून त्याचें मनन करून आपणांस तसें बनावयाचें आहे ही दृढ भावना करून घ्यावी व शिक्षकांनीं चरित्र–नायकाचे गुण वारंवार विद्यार्थ्यांचे नजरेस आणून त्यांस पुढील आयुष्यक्रमाचा मार्ग सोपा करून देण्याचें श्रेय घ्यावें.

सुदैवानें बुकर टी. वाशिंग्टनसारख्या विभूति या आर्यभूमींतही निर्माण होत आहेत त्यांचींही चरित्रें लिहून त्या योगें आमचीं बाल–वाचन–मंदिरें अलंकृत करावीं अशी रा. बाबर व त्यांचे व्यवसाय–बंधु यांस मी शिफारस करितों.

या पुस्तकास प्रस्तावना लिहून माझे भावी पिढीच्या शिक्षणाविषयीं विचार वाचकांपुढें मांडण्यास मला संधि दिली याबद्दल मी रा. बाबर यांचा आभारी आहें.

शेवटीं रा. बाबर यांच्या प्रयत्नास प्रोत्साहन मिळावें अशी विनंति करून हें पुस्तक मी वाचकांचे हवालीं करतों.

वाई.<br>ता. ११–१०–२३ } **कृष्णाजी शंकर दीक्षित,**<br>डेप्युटि एज्युकेशनल इन्स्पेक्टर, सातारा.

---

# एक नमुनेदार विद्यार्थी!

## उपोद्घात.

अगदीं गरीब स्थितींत आणि अगदीं हलक्या जातींत जन्माला येऊन ज्यानें केवळ आपल्या विद्याभ्यासाच्या जोरावर आपली स्वतःची, आपल्या जातीची आणि परंपरेनें आपल्या राष्ट्राची उन्नति केली आहे, असा विद्यार्थी म्हणजे नमुनेदार विद्यार्थी होय. अशा विद्यार्थ्याचें चरित्र कोणाही विद्यार्थ्यास अत्यंत अनुकरणीय असतें. अलीकडच्या काळांत असा एक विद्यार्थी होऊन गेला. या विद्यार्थ्याचें नांव बुकर टी. वाशिंग्टन. याचें चरित्र जगांतील कोणत्याही जातीच्या व कोणत्याही धर्माच्या विद्यार्थ्यास अत्यंत उपयोगीं पडण्यासारखें असल्यामुळें, तें थोडक्यांत या पुस्तकांत देण्यांत आलेलें आहे.

बुकर टी. वाशिंग्टन याचें चरित्रांतली विशेष गोष्ट ही कीं, जगांतील कोणताही विद्यार्थी त्याच्या इतक्या गरीब आणि हलक्या स्थितींत जन्मलेला नसेल. तो जातीचा निग्रो असून त्याची आई एका गोऱ्या गृहस्थाचे घरीं गुलाम* होती. अशा

*पूर्वीच्या काळीं लढाईत पकडून आणलेल्या लोकांची जनावरांप्रमाणें बाजारांत विक्री करीत असत आणि विकत घेणारे लोक या लोकांना जनावरांप्रमाणेंच वागवीत. विकल्या जाणाऱ्या या लोकांना गुलाम असें म्हणत. आफ्रिका खंडांतील निग्रो ऊर्फ हबशी या काळ्या वर्णाच्या लोकांना अमेरिकेंतील गोऱ्या लोकांनीं गुलाम म्हणून प्रथम नेलें. त्यांनीं ज्या जहाजांत भरून यांना पकडून नेलें त्याचें नांव 'जीजस' असें पवित्र ठेवलेलें होतें. या निग्रो लोकांना पकडतांना दयामाया

गुलाम आईच्या पोटीं बुकर टी वाशिंग्टन याचा जन्म झाला. गुलाम असल्यामुळें त्याच्या आईला अनेक गोऱ्या धन्यांच्या घरीं काम करावें लागे व ते लोक तिला आपल्या रखेल्या बाई-प्रमाणेंही वागवीत असत! त्यामुळें बुकर टी. वाशिंग्टन याचा बाप कोणता हें त्याच्या आईलाही सांगता येण्यासारखें नव्हतें. शिवाय ज्या अमेरिका देशांत बुकरचा जन्म झाला, त्या देशांत निग्रो लोकांस अत्यंत हलके मानीत असतात, त्यामुळें बुकर टी वाशिंग्टनचा जन्म अत्यंत हलक्या स्थितींत झाला असें वर म्हटलें आहे. शिवाय लहानपणीं त्याची स्थिति इतकी गरीबीची होती कीं, आपल्या मुलाचें पोट भरावें म्हणून पुष्कळ वेळां त्याच्या आईला अर्धपोटीं राहावें लागत असे. आणि आपली भूक नाहींशी व्हावी, म्हणून त्या मुलालाही कितीतरी वेळां आपल्या गोऱ्या धन्याच्या मळ्यांतील पाळींव डुकरांच्या पुढील मक्याचे दाणे—खातां खातां त्यांचे तोंडांतून पडलेले—खावे लागले आहेत. आठवड्यांत एकदां दर रविवारीं एक लहानशी

---

न धरतां रानटी जनावरांप्रमाणेंच पकडिलें व जहाजांतून नेतांनाही जनावरांप्रमाणेंच वागविलें. बरेच लोक जहाजांतच मरण पावले! आणि अमेरिकेंत पोहोंचतांच मुलगा, आई, बाप, बहीण, भाऊ वगैरेंचा विचार न करतां निरनिराळ्या धन्यांस निरनिराळीं माणसें विकून टाकण्यांत आलीं! असे बरेच लोक अमेरिकेंत गुलाम म्हणून आणून विकण्यांत आले.पूर्वींच्या काळीं हा एक व्यापारच होता! पुढें या गुलाम लोकांचे हाल पाहून कांहीं उदार बुद्धीच्या गोऱ्या लोकांनाच वाईट वाटूं लागलें व त्यांनीं गुलामगिरी नाहींशी करण्याचा यत्न केला. या कामीं पुष्कळ गोऱ्या लोकांचा विरोध झाल्यामुळें त्या थोर उदारात्म्या थोर पुरुषांना आपले प्राणही बळी द्यावे लागले! या थोर पुरुषांपैकीं अमेरिकेचे प्रेसिडेंट महात्मा लिंकनसाहेब हे एक होत. इ. स. १८६५ चे सुमारास गुलामगिरी नाहींशी झाली. या सुमारास ४०००००० निग्रो लोक अमेरिकेंत होते. हल्लीं ११०००००० आहेत.

वाटी भरून काकवी त्याचा मालक त्याला देत असे. ही काकवी म्हणजे बुकरला अमृतासारखी वाटत असे. ज्या घरांत त्याचें बालपण गेलें तें घर म्हणजे एक लहानसें खोपटें होतें. ऊन, वारा, पाऊस याला फारसा मज्जाव त्या घरानें कधीं केला नाहीं! त्याला कपडेलत्तेही लहानपणीं चांगले मिळाले नाहींत. डोक्याला घालण्याला एक साधी टोपी त्याचे सहावे सातवे वर्षीं मिळाली. ही टोपी ह्मणजे त्याचे आईनें घरांतलि एका फडक्यास दोन दोरे घालून तयार केलेली टोपी होती! यावरून त्याचें बालपण किती द्रारिद्रावस्थेंत गेलेलें आहे तें दिसून येईल.

हाच दरिद्री व हलक्या स्थितींतील बुकर पुढें आपल्या कर्तबगारीनें इतक्या उन्नतावस्थेस चढला कीं, अमेरिकेंतील सयुक्त संस्थानांतील सरकारनें त्याला एका प्रांताच्या गव्हर्नरची जागा देऊं केली व बड्या बड्या आणि विद्वान् लोकांकडून त्याला भोजनाचीं आमंत्रणें येऊं लागलीं. सारांश, त्याच्या पूर्वींच्या व नंतरच्या चरित्रांत जमीन अस्मानचें अंतर पडलें. इतक्या नीच अवस्थेंतून इतक्या उच्च अवस्थेस पोहोचलेला एकादा दुसरा विद्यार्थी जगांत दिसून येईल असें वाटत नाहीं. कांहीं दिवसांपूर्वीं एका इंग्रजी वर्तमानपत्रांतून एका विद्यार्थ्याची हकीकत प्रसिद्ध झालेली होती. हा विद्यार्थी पंजाबांतील एका बड्या गृहस्थाचा मुलगा असून इंग्लंडमध्यें शिकावयास राहिलेला होता. दरमहा कमींत कमी १५०० रुपये त्याला खर्च येत असे! असल्या विद्यार्थ्याचें चरित्र इतर विद्यार्थ्यांस मार्गदर्शक होइल काय? बुकर टी वाशिंग्टनयाचें चरित्र याच्या अगदीं उलट स्थितींतील आहे, आणि म्हणूनच तें इतरांना मार्गदर्शक होणारें आहे.

# एक नमुनेदार विद्यार्थी.

हल्लींच्या काळीं आपल्या विद्यार्थ्यांत ज्या गुणांचा अभाव दिसून येतो, आणि ज्यामुळें त्यांचें अकल्याण होतें, ते गुण ह्मणजे आत्मविश्वास व श्रम करण्याची आवड हे होत. हे गुण बुकर टी वाशिंग्टनचें चरित्र वाचणाऱ्या विद्यार्थ्यांचे आंगीं खात्रीनें येतील असें मला वाटतें आणि म्हणूनच 'नमुनेदार विद्यार्थी' म्हणून बुकर टी. वाशिंग्टनचें चरित्र विद्यार्थी मित्रांचें पुढें ठेवण्याचें धाडस मी या पुस्तकरूपानें करीत आहें. या चरित्राचें अध्ययनापासून आपल्या देशांतील विद्यार्थी कर्तबगार निपजतील अशी लेखकाला दृढाशा आहे.

———

# एक नमुनेदार विद्यार्थी.



## प्रकरण पहिलें.



### मळ्यांतील गुलामांच्या झोंपडींत.

बुकर टी. वाशिंग्टन याचा जन्म इ. स. १८५८।५९ च्या सुमारास झाला. त्यावेळीं त्याची आई अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील व्हर्जिनिया प्रांतांतील फ्रांकलिन परगण्यांत एका मळेवाल्या गोऱ्या गृहस्थाचे घरीं गुलाम म्हणून राहात होती. बुकरला किंवा त्याच्या आईला आपल्या पूर्वजांविषयीं कांहीं माहिती नव्हती. तिचें राहतें घर १६ फूट लांब व १४ फूट रुंद एवढें होतें. या घराला एक मोठें भगदाड होतें; त्यांतून कुत्रीं मांजरें सहज जात येत ! बुकरची आई मळेवाल्याचे नोकर–चाकरांस स्वयंपाक करून घालण्याचे कामावर होती. तिला स्वतःला मजुरी फार थोडी मिळे, त्यामुळें स्वतःच्या मुलांना पोटभर अन्न घालणें तिला अत्यंत जिकीरीचें झालें होतें. बुकरला जॉन नांवाचा एक वडील भाऊ होता आणि एक बहीणही होती. या मुलांना कांहींतरी खावयास मिळावें, म्हणून त्यांची आई धन्याच्या मळ्यांतील एक कोंबडीचें पिलूं रोज रात्रीं चोरून आणीत असे, व तें शिजवून घालून मुलांची भूक कशीतरी शमवीत असे. स्वतः ती अर्धपोटींच राहात असे. दिवसभर भरपूर काम करून

रात्रीं मुलांच्या स्वयंपाकासाठीं तिला जागरण बरेंच पडे आणि पहांटे लवकर उठावें लागे, यावरून त्या माउलीच्या करुण स्थितीची थोडी तरी कल्पना येईल. आतां कांहीं बालवाचक असें म्हणतील कीं, ' बुकरची आई कोंबडीच्या पिलाची चोरी करीत असे, हें कांहीं चांगलें नाहीं. ' हें बालमित्रांचें म्हणणें चुकीचें नाहीं. पण तिच्या लहान लहान दोन तीन मुलांच्या दीन आणि करुण स्थितीचा विचार करणारा कोणीही मनुष्य तिला या चोरीबद्दल क्षमाच करील. एका गुलाम बाईचीं तीन मुलें. त्यांची मायेनें चौकशी आईशिवाय दुसरें कोण करणार ? बुकरनें आपल्या आईबद्दल फार चांगले उद्गार काढले आहेत. त्याची आई फार नीतिमान् आणि व्यवहारदक्ष होती. पुढें मोठे-पणा प्राप्त झाल्यावर बुकर टी. वाशिंग्टन म्हणत असत कीं, 'मला हे दिवस आईच्या कृपेनेंच मिळाले आहेत !

बहुतेक सर्व मुलांचें लहानपण खेळण्यांत जात असतें. पण बुकरला खेळण्याला वेळच मिळाला नाहीं. वयाच्या चौथ्या पांचव्या वर्षांपासून त्याला पोटासाठीं काम करावें लागलें. अमेरिकेंतील राहाणी फार खर्चाची असल्यामुळें तीन चार माणसांच्या कुटुंबाचें पोषण एक गुलाम बाई कशी करणार ? जॉन आणि बुकर हे अगदीं लहानपणापासूनच काम करूं लागले. धन्याच्या घरापुढील आंगणें झाडणें, शेतांत काम करणाऱ्या लोकांना पाणी पुरविणें, धन्याच्या मुलांना शाळेस पोंचविणें व आठवड्यांतून एकदां तीन मैल दूर असलेल्या गांवाहून दळण दळून आणणें इत्यादि कामें बुकरला करावीं लागत. एका गाढवावर धान्य लादून त्याला हांकीत नेऊन दळण दळून आणावें लागे. त्या गांवचा रस्ता जंगलांतून होता आणि त्या

जंगलांत भूत आहे म्हणून लोक सांगत, त्यामुळें चार पांच वर्षांचा बुकर दळण दळून आणावयास जातांना फार भीत असे. पण करणार काय ? काम करण्याशिवाय सोय नव्हती.

या गुलाम मुलांना घालावयास तागाचा सदरा मिळत असे. तो फार खरबरीत असे. म्हणून बुकरचा भाऊ जॉन हा प्रथम कांहीं दिवस स्वतः वापरून थोडा मऊ झाला म्हणजे मग तो सदरा बुकरला देत असे ! पायांत घालण्यासाठीं त्यांना लांकडी जोडा मिळत असे ! तोही फार त्रासदायक असे. खाण्याचे तर फार हाल होत. या गुलाम मुलांचें खाणें म्हणजे जनावरांचें खाणेंच होय. केव्हां एकादा भाकरीचा तुकडाच, तर केव्हां मांसाचा नुसता गोळाच ! केव्हां थोडेंसें नुसतें दूधच, तर केव्हां एकादा बटाटाच ! यामुळें या मुलांचें पोट भरत नसे आणि मग त्यांना डुकरांचे तोंडांतून पडलेले मक्याचे दाणे वेंचून खाऊन पोट भरावें लागे ! आपल्या इकडील अगदीं गरीब व हलक्या जातीच्या मुलांचीही इतकी हीन स्थिति असेल, असें वाटत नाहीं. बुकरच्या धन्याकडून दर रविवारीं सर्व मंडळींना वाटी-वाटीभर काकवी मिळत असे. हेंच या मुलांचें पक्वान्न ! ही वाटी-भर काकवी मिळणार म्हणून या मुलांना रविवारचें महत्त्व फार वाटत असे ! थोरपणीं मोठमोठीं पक्वान्नें खाण्याचा प्रसंग आला असतां बुकर टी. वॉशिंग्टन यांस काकवीची आठवण होत असे. त्याच्या धन्याच्या घरीं ‘ जिंजर केक ’ म्हणून एक तऱ्हेचें पक्वान्न होत असे. तें आपणाला थोडें तरी मिळावें असें बुकरला लहानपणीं फार वाटत असे.पण त्याची इच्छा तृप्त कशी होणार? ‘उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्रणां मनोरथाः।’ म्हणजे दरिद्री लोकांचे मनोरथ उत्पन्न होतात आणि लगेच नाहींसेही होतात, हेंच खरें.

# प्रकरण दुसरें.

## माल्डन गांवीं प्रयाण.

अमेरिकेचे एक प्रेसिडेंट महात्मा लिंकन साहेब यांचे प्रयत्नानें इ० स० १८६५ सालापासून ' गुलामगिरी ' बंद झाली. बुकर, त्याची आई व भावंडें यांची इतर निग्रो गुलामांबरोबरच मुक्तता झाली. अनेक दिवस गुलामगिरींत गेल्यामुळें हे निग्रो लोक इतके परावलंबी बनले होते कीं, त्यांच्यापैकीं पुष्कळांना स्वतंत्रता आवडली नाहीं. कारण स्वावलंबनानें एकादा धंदा करून पोट भरण्याचें किंवा कुटुंबाचें पोषण करण्याचें त्यांना माहीतच न्हवतें; त्यामुळें बरेच निग्रो गुलाम आपल्या पूर्वीच्या धन्याच्या घरींच नोकर म्हणून राहिले. बुकर टी. वाशिंग्टन आणि त्याची आई व भावंडें हीं वेस्ट व्हर्जिनिया संस्थानच्या चार्लस्टन राजधानीपासून सुमारें पांच मैलांवर असलेल्या माल्डन नांवाच्या गांवाला राहण्याला गेले. हें गांव फार दूर होतें आणि सर्व प्रवास त्या मुलांनाही पायींच करावा लागला. या गांवीं बुकरचा सावत्र बाप राहात असे. हा मनुष्य निग्रो जातीचा असून त्याचा व बुकरचे आईचा पूर्वीं संबंध घडून आलेला होता.

माल्डन गांवीं राहावयास आल्यामुळें, बुकरच्या कुटुंबाला मोठ भाग्याचे दिवस लाभले असें मुळींच घडून आलें नाहीं. बापानें जें घर या मुलांच्याकरितां पाहून ठेवलें होतें, तें पूर्वींच्या मळ्यांतील घरापेक्षां चांगलें मुळींच न्हवतें. उलट एका दृष्टीनें वाईटच होतें. ह्या नव्या घरांत स्वच्छ हवा खेळत न्हवती आणि आसपास शेजारही चांगल्या लोकांचा न्हवता. बुकरचा

बाप मिठाच्या चुलाणाचें काम करीत असे आणि त्यानें बुकरला व त्याचे भावाला मिठाच्या भट्टींत काम मिळवून दिलें. पाहांटे ४ वाजतां उठून या मुलांना कामावर जावें लागे. बुकरचें हें वय शाळेंत जाण्याचें वय होतें. पूर्वीं धन्याच्या घरीं असतांना त्यांचीं मुलें शाळेंत पोंचविलीं म्हणजे बुकरला फार चुटपुट लागे. त्याला आपणही लिहावयास आणि वाचावयास शिकावें असें वाटत असे. पण त्या वेळीं या विचाराचा उपयोग काय ? माल्डन गांवीं शिक्षणाची कांहीं सोय नव्हती आणि कामांतून या मुलांना सुटकाही मिळत नव्हती. बुकरला प्रथम मिळालेलें पुस्तकी ज्ञान म्हणजे त्याच्या बापाचा १८ नंबरचा आंकडा ध्यानांत ठेवणें हें होय ! मिठानें भरलेल्या पिपांवर हा नंबर घालावा लागत असे. आपणास जास्त शिकतां आलें नाहीं, तर सामान्य पुस्तकें आणि वर्तमानपत्रें वाचतां येण्याजोगें शिक्षण आपण मिळविणारच !! असा बुकरनें निश्चय केला होता. माल्डन-गांवीं राहावयास आल्यावर ' मला एक पुस्तक मिळवून दे ' अशी मागणी आईजवळ बुकरनें केली. त्याच्या आईनेंही कुठून तरी एक ' ब्ल्यूब्लॅक–स्पेलिंग बुक ' नांवाचें धुळाक्षरांचें पुस्तक आणून दिलें. तें शिक्षकाचे मदतीवांचूनच वाचण्याचा त्यानें प्रयत्न चालविला. तेथें त्याला शिकवील असा त्याच्या जातीचा शिकलेला एकहि माणूस कोणी नव्हता आणि गोऱ्या माणसाकडे जाण्याला तो भीत असे. पण त्याची महत्त्वाकांक्षा दांडगी होती. पुढें लवकरच एका अल्पशिक्षित निग्रो गृहस्थानें माल्डनला येऊन शाळा काढली. शिक्षण संपादन केल्याशिवाय सोय नाहीं, हें सर्व निग्रो जातीला पटलें असल्यामुळें या शाळेंत मुलांचा खूप भरणा झाला. निग्रो लोकांची स्थिति गरिबीची

असल्यामुळें शिक्षकाला पगार देण्याचें सामर्थ्य त्यांचे ठिकाणीं नव्हतें. म्हणून त्यांनीं वार लावून त्याची जेवणाची व्यवस्था लावून दिली होती ! शिक्षकालाही ही योजना पसंत होती. या शिक्षकानें सुरू केलेली ही शाळा सकाळीं ९ वाजतां सुरू होत असे; आणि बुकरला तर भट्टींत नऊ वाजेपर्यंत काम करावें लागे, म्हणून शाळेंत जाण्याला त्याला उशीर होत असे. यावेळीं आपणाला शाळेंत जाण्याला मिळावें म्हणून बुकरनें बरेच वेळां कारखान्यांतील घड्याळाचे कांटे पुढें सारले आहेत ! शिक्षण संपादन करण्याची त्याची इच्छा किती जबरदस्त होती, हें यावरून कळून येईल. शिवाय त्याला खरें बोलण्याची व खरेपणानें वागण्याची संवय होती. हें वाईट काम आपण केलें असल्याचें त्यानें स्वतःच आपल्या चरित्रांत लिहून ठेविलें आहे.

या शाळेंत जात असतांच बुकरच्या पुढें दोन अडचणी उभ्या राहिल्या. एक त्याला घालावयास टोपी पाहिजे होती व दुसरी अडचण त्याचें नांव शाळेंतील इतर मुलांप्रमाणें दोन शब्दांचें नव्हतें. त्यानें टोपीची अडचण आईकडून कशी भागविली तें उपोद्घातांत सांगितलेंच आहे. त्याचें ' बुकर ' एवढेंच नांव आतांपर्यंत होतें. शाळेंत जाऊं लागतांच आपल्या नांवापुढें टी. वाशिंग्टन हें नांव त्यानें जोडलें. यांतील वाशिंग्टन हें नांव जॉर्ज वाशिंग्टनची स्मृति देणारें आहे आणि त्याचा उपयोग आडनांवासारखा बुकरनें करून घेतला. पण टी. या अक्षराकडे त्यानें उपयोग किंवा अर्थ या दृष्टीनें पाहिलेंच नाहीं. कांहीं लोकांचीं तीन अक्षरीं नांवें असतात, तसें आपलें असावें म्हणूनच त्यानें हें अक्षर मध्यंतरीं घालून टाकलें एवढेंच ! असो. पुढें लवकरच दिवसाची शाळा बंद झाली आणि आपला दिवसाचा

सारा वेळ त्याला आपल्या कामातच घालवावा लागला. पण त्याची महत्त्वाकांक्षा मेली नाहीं. रात्रींच्या शाळेंत जाण्याचा त्यानें बेत केला. त्याच्या गांवीं त्याच्यापेक्षां जास्त शिकलेला मनुष्य रात्रीच्या शाळेला शिक्षक म्हणून मिळेना. म्हणून कित्येक वेळां कामावरून परत आल्यावर रात्रीं पुष्कळ मैल चालून जाऊन परगांवाहून तो धडे शिकून येत असे ! बुकर टी. वाशिंग्टनची ही शिक्षणासाठीं चाललेली धडपड पाहून आश्चर्य वाटतें. आपल्या इकडील किती विद्यार्थ्यांना याच्या शतांश तरी कळकळ वाटते ? कोणत्याही प्रकारची सोय नसतां आणि दिवसभर श्रम झाले असतां, सहा सात वर्षांचें पोर शिक्षणासाठीं किती तळमळत होतें, हें लक्षांत ध्या; म्हणजे मी त्यांना 'एक नमुनेदार विद्यार्थी' कां म्हणतों, हें कळेल. रात्रीं शाळेंत जाऊं लागला त्यावेळीं दिवसां बुकरकडे दगडी कोळशाच्या भट्टींतील काम असे. त्यानें लिहून ठेवलें आहे कीं, "**आपल्या यशाचें मोल आपणांस किती अडचणींशीं झगडावें लागलें यावरून ठरवावें.**" सर्व प्रकारच्या साधनांच्या साह्यानें मिळालेल्या यशाची खरी किंमतच नाहीं. बुकर म्हणत असे कीं, 'मी अगदीं दरिद्री आणि हलक्या कुळांत जन्माला आलों, हेंच चांगलें झालें. कारण त्यामुळें शिक्षणाची लालसा माझे ठिकाणीं उत्कटतेनें उत्पन्न झाली !' यावेळीं निग्रो लोकांना 'अत्यंत नीच लोक' असें गोरे लोक मानीत आणि समाजांतील कोणत्याही प्रकारचे समान हक्क या लोकांना नव्हते. असें असतां बुकरच्या मनांत आलेले हे विचार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. तो म्हणतो "**योग्यता किंवा श्रेष्ठता—मग ती कोणत्याही रंगाच्या कातडीच्या मनुष्यांत आढळो शेवटीं--ओळखिली जाणार आणि विजयी**

होणार ! " आपल्या असलेल्या परिस्थितींत समाधान मानून तींतूनच आपली उन्नति करून घेण्याचा हा बुकरचा यत्न प्रत्येक विद्यार्थ्यानें लक्षांत ठेवावा.

---

## प्रकरण ३ रें.



### शिक्षणाची तळमळ.

माल्डन येथें सुमारें दहा अकरा वर्षांचें वय होईपर्यंत बुकर राहिला. तेथें दगडी कोळशाच्या खाणींत काम करीत असतां निग्रो लोकांसाठीं ' हाम्पटन ' गांवीं आर्मस्ट्रांग नांवाच्या एका उदार गोऱ्या गृहस्थानें शाळा उघडली आहे; आणि या शाळेंत उद्योगधंदा करून विद्यार्थ्यांना आपलें पोट भरतां येईल अशी-ही व्यवस्था करण्यांत आलेली आहे. असें दोघे बेलदार आप-सांत बोलत असतां बुकरनें ऐकिलें. या शाळेच्या संस्थेचें नांव ' हाम्पटन, नार्मल आणि अग्रिकल्चरल इन्स्टिटयूट ' असें होतें बुकरला शिक्षणाची अत्यंत तळमळ लागली असल्यामुळें, ह्या शाळेंत आपणांस केव्हां आणि कसें जातां येईल, हीच त्याला काळजी लागून राहिली. हाम्पटन हें ठिकाण माल्डनहून सुमारें ५०० मैल दूर आहे. इतक्या दूर जाण्याला वाटेंत पोटासाठीं कांहीं तरी खर्च येणारच. तो कोठला आणावयाचा ! बुकर-जवळ तर एक पैही नव्हती; पण ' इच्छेला मार्ग सांपडतोच' या म्हणीप्रमाणें बुकरनें या खर्चाची व्यवस्था करण्यासाठींही एक मार्ग शोधून काढला. तो ज्या कारखान्यांत माल्डन एथें

काम करीत होता, त्या कारखान्याचे मालक जनरल लेविस रफनर यांच्या घरीं एक जागा रिकामी झालेली पाहून बुकरनें त्या जागीं नोकरी धरली.

रफनरसाहेबांची पत्नी व्हायोला रफनर यांचा स्वभाव थोडा तापट होता आणि त्यांना व्यवस्थितपणा व शिस्त यांची फार आवड होती. त्यामुळें त्यांचें घरीं कोणींही नोकर फार दिवस टिकत नसे. बुकरनें या जागीं नोकरी धरल्यावर तो रफनरबाईंच्या इतका पसंतीस उतरला कीं, पुढें त्याच्या आयुष्यांत पुष्कळ वेळां रफनरबाईनें त्याला मदत केली. वेळच्यावेळीं व व्यवस्थित काम करण्यांत बुकर फार तरबेज असे. आंगचोरपणा त्याला मुळींच माहीत नव्हता, त्यामुळें त्याचे धनी नेहमीं त्याजवर खूष असत. पण अजून त्याचें पोरवय असल्यामुळें त्याला पगार फार मिळत नसे. त्यामुळें शिल्लक बहुधा कांहीं राहात नसे. रफनरबाईच्या घरीं वर्ष दीडवर्ष काढल्यावर इ. स० १८७२ सालीं हाम्पटनला जाण्याची इच्छा पुन्हां जोरानें त्याचे मनांत उद्भवली व त्या हेतूनें ही नोकरी सोडून तो आपल्या आईकडे गेला आणि तिला त्यानें आपले विचार सांगितलें. इतक्या दूरच्या गांवीं आपला मुलगा जाणार ह्मणून तिला वाईट वाटलें. पण त्याचें तेथें जाण्यानें कल्याण होईल अशी तिची खात्री झाल्यामुळें, तिनें या कामीं त्याला सहानुभूति दर्शविली. आईशिवाय इतर मात्र कोणीं त्याला सहानुभूति दाखविली नाहीं. त्याच्या या विचाराला पुष्कळांनीं नांवें ठेविलीं. पण याच सुमारास आई फार आजारी पडली, तिची पुन्हां भेट होईल कीं नाहीं अशीही शंका बुकरला वाटली, पण शिक्षणासाठीं त्याला इतकी तळमळ वाटत होती कीं, घरांत

होते तेवढे कपडे एका पिशवींत भरून तो हाम्पटनला जाण्यास निघाला. आईनें तोंडावरून हात फिरवून अश्रुपूर्ण नेत्रांनीं त्याला आशीर्वाद दिला! आईजवळ त्याला देण्याला पैसा अडका नव्हताच. पण आईच्या प्रेमळ आशिर्वादाची बरोबरी पैसाअडका करील काय? बुकरची शिक्षणलालसा पाहून त्याच्या वडील बंधूनेंही त्याला थोडीशी मदत दिली. त्याच्या जवळ तरी शिल्लक कोठली असणार? कांहीं वृद्ध निग्रोनींहि आपल्या जातीचा एक मुलगा शहाणा होत आहे, हें पाहून कोणीं आणा दोन आणे, कोणीं हातरुमाल वगैरे देऊन मदत केली व बुकरनें एकदांचें माल्डन सोडलें.

प्रवासांत अतोनात अडचणी आल्या. बुकरचें वय १३।१४ वर्षांचें होतें. हाम्पटन फार दूर होतें. तेथपर्यंत रेल्वेनें जाण्याला पुरेल इतका भाडेखर्च करण्याची त्यास ताकद नव्हती, आणि त्याची जात निग्रो असल्यामुळें रेल्वेंत, हॉटेलांत, किंवा इतर कोठेंही त्याची हेटाळणाच होत होती. एकदां एका साध्या गाडीनें प्रवास करून रात्रीं एका गांवीं बुकर पोंचला व तेथील खाणावळींत आश्रयास गेला, पण त्याची कातडी काळी आहे एवढ्याच सबबीवर त्या खाणावळीच्या मालकानें त्याला भोजन देण्याचें किंवा राहण्यास जागा देण्याचें साफ नाकारलें! दिवस हिंवाळ्याचे होते आणि जवळ कपडेलत्तेही भरपूर नव्हते. त्यामुळें रस्त्यांत इकडे तिकडे हिंडून आंगांत उष्णता आणून त्याला उपाशींच रात्र काढावी लागली! दुसऱ्या एका प्रसंगीं असेंच झालें. वाटेंत मिळेल त्या गांवीं कामधंदा करून पोट भरीत व पैसे मिळाल्यास गाडीनें प्रवास करीत हाम्पटनपासून ८२ मैलांवर असलेल्या रिचमंड शहरीं बुकर जाऊन पोहों-

चला. तो रात्रीं या गांवीं जाऊन पोंहोंचला, त्यामुळें त्याला खावयास अन्न किंवा आसऱ्याला जागा कुठेंच मिळाली नाहीं. दिवसभरही कांहीं खावयास न मिळाल्यामुळें भुकेनें प्राण व्याकुळ होऊन गेले होते, पण करणार काय? शेवटीं शहराबाहेर एका रस्त्याला लागून असलेल्या उंचवट्याखालीं कपड्यांची पिशवी उशाला घेऊन तो निजला. थंडी फार लागत होती, पोटांत अन्न नाहीं आणि रस्त्यावरून गाड्या जात येत होत्या त्यांचा आवाज कानीं पडत होता, यामुळें रात्रभर त्याला झोंप लागली नाहीं. दुसऱ्या दिवशीं काम मिळावें म्हणून सर्व शहरभर हिंडला पण काम मिळालें नाहीं. जवळ एक पैही उरलेली नव्हती, अशा स्थितींत पोटाला कसें मिळणार? अमेरिकेंत आपल्या देशांतल्याप्रमाणें भिकाऱ्यास भिक्षा घालीत नाहींत. तिकडील कायद्याप्रमाणें 'भिक्षा मागणाराला शिक्षा' होते. काम धंदा करूनच पोट भरलें पाहिजे. अर्थात् दुसरा दिवस बुकरचा अन्नपाण्यावांचून गेला आणि रात्रीं पुन्हां गांवाबाहेरच्या उंचवट्याचा आश्रय त्याला करावा लागला! त्यानें आपल्या चरित्रांत लिहिलें आहे. "**मी थकलों, भागलों, क्षुधित झालों, सर्व कांहीं झालें पण मी निराश मात्र झालों नाहीं.**" टांकीचें घाव सोसल्याशिवाय दगडाला देवपणा येत नाहीं हेंच खरें. अशा अडचणीला त्यानें तोंड दिलें. तिसरे दिवशीं त्या शहरांत त्याला काम मिळालें, तें काम करून सायंकाळीं त्या कामाच्या मजुरीच्या पैशानें त्यानें एका ठिकाणीं भोजन केलें व निजावयास जागा मिळविली. पुढें कांहीं दिवस याच शहरांत काढून वाटखर्चीपुरतें पैसे मिळवून बुकर हाम्पटनला जाण्याला निघाला. शेवटीं एकदांचा तो आपल्या इच्छित स्थळीं जाऊन

पोहोंचला. शिक्षणाची इतकी तळमळ आपल्या इकडील एकाद्या विद्यार्थ्यांत दिसून येईल काय? बालमित्रांनो, बुकरचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवा.

---

## प्रकरण ४ थें.



### हाम्पटन शाळेची प्रवेशपरीक्षा.

हाम्पटनला जाऊन पोंहोंचतांच बुकरला अत्यंत आनंद वाटला. इतके कष्ट सोसल्यासारखे आपण इष्टस्थळीं पोंचलों, म्हणून त्याला समाधान वाटलें. हाम्पटन येथील शाळेच्या इमारतीसारखी सुंदर इमारत त्यानें पूर्वीं पाहिलीच नव्हती. शाळेच्या वातावरणांत येतांच 'आपण स्वर्गांत आलों आहों' असेंच त्याला वाटलें. पण आतां आपला प्रवेश आंत कसा होणार? आपलें नांव शाळेंत कसें घातलें जाणार? याबद्दल त्याला काळजी वाटूं लागली. प्रवासानें त्याचा चेहरा सुकून गेला होता आणि सर्व कपडेही मळलेले होते. अशा स्थितींत आपली खरी परिक्षा कशी होणार? एक अजागळ पोर म्हणून हांकलून दिल्यास काय करावें, याची त्याला चिंता लागून राहिली. हाम्पटन संस्थेच्या मुख्याध्यापिका मिस्. मेरी मॅकी यांना जाऊन बुकरची स्वारी भेटली व मला कोणत्या तरी वर्गांत दाखल करा, अशी त्यान विनंति केली. बुकरला पाहिल्याबरोबर मिस मॅकी यांचे मनांत त्याच्याविषयीं अनुकूल ग्रह उत्पन्न झाला नाहीं. याला आपल्या शाळेंत दाखल करून घ्यावा कीं नाहीं याचा नक्की विचार

तिचा ठरेना. मध्यंतरींच बुकरच्या देखत त्या बाईनें दुसऱ्या विद्यार्थ्यांस दाखल करून घेतलेलें पाहिल्यावर मात्र बुकरची चिंता वाढत चालली. त्याला आपली लायकी दाखविण्याची संधीच मिळेना. कांहीं वेळ गेल्यावर त्या मुख्याध्यापिका बाई म्हणाल्या " जवळची खोली झाडून स्वच्छ केली पाहिजे. केरसुणी घेऊन ती लोटून टाक. " आतां मात्र बुकरला अत्यंत आनंद झाला. आतां आपली लायकी दाखविण्याची संधी आपल्याला मिळाली, असें त्याला वाटलें. गोऱ्या स्त्रियांना स्वच्छता कशी आवडते हें रफनर बाईच्या घरीं असतांना त्याला कळून चुकलें होतें. आणि लोटून कसें काढावें हेंही तो तेथें शिकला होता. त्यामुळें त्यानें आपलें काम चोख करून ठेवलें. तीनदां चारदां ती खोली त्यानें स्वच्छ झाडून काढली आणि फडकें घेऊन कोनाकोपऱ्यांतला सुद्धां धुरळा सगळा काढून टाकला. या आपल्या कामगिरीनेंच या पवित्र शाळेंत आपला प्रवेश होणार आहे हें बुकर जाणून होता. म्हणून अगदीं मन लावून त्यानें हें काम केलें.

खोली लोटून झाल्यावर बुकरनें मिस् मेरी मॅकी यांना जाऊन सांगितलें. ती बाई अत्यंत स्वच्छताप्रिय होती, तिला धूळ कोठें राहाते आणि केर कुठें राहातो हें माहीत होतें. तिनें खोली बारकाईनें पाहिली, पण केर किंवा धुरळा तिला कोठेंही आढळला नाहीं. शेवटीं आपल्या खिशांतील पांढरा स्वच्छ हातरुमाल काढून तिनें तो ओला केला व टेबल, कपाटें आणि खिडक्यांचीं तावदानें यावर तो रुमाल फिरवून पाहिला पण तो मुळींच मळलेला दिसला नाहीं. तेव्हां मात्र तिचें पूर्वीचें मत पालटलें आणि बुकराविषयीं तिच्या मनांत प्रेम उत्पन्न होऊन ती त्याला

म्हणाली, " या शाळेंत दाखल होण्यास तूं योग्य आहेस, असें मला वाटतें. " हें ऐकतांच त्याचा आनंद गगनांत मावेना. आपलें मनोगत पूर्ण झालें म्हणून त्याला अतिशय समाधान वाटूं लागलें. पण **ज्या प्रवेशपरीक्षेनें त्याचा हाम्पटन एथील संस्थेंत प्रवेश झाला, ती परीक्षा म्हणजे 'खोली लोटून स्वच्छ करणें' ही होय.**

आपल्या इकडील विद्यार्थ्यांना बुकरच्या प्रवेशपरीक्षेवरून पुष्कळ शिकतां येण्यासारखें आहे. शिवाय अमेरिकेंतील शिक्षण आणि आपल्याकडील शिक्षण यांतील भेदही कळून येण्यासारखा आहे. आपल्या इकडे केवळ पुस्तकी ज्ञानावरूनच प्रवेशपरीक्षा करण्यांत येते आणि आपणांस कामधंदा करावयास लागूं नये, शक्य तितकें चैनींत राहावयास मिळावें, ही आपल्या इकडच्या विद्यार्थ्यांत भावना उत्पन्न होते. अमेरिकेंत याच्या उलट परिस्थिति असते. तिकडे श्रम करणारांची योग्यता मोठी मानली जाते. आणि विद्यार्थ्यांची लायकी पाहातांना त्याच्या आंगांत व्यवहारज्ञान कितपत आहे, उद्योगधंद्याची त्याला आवड आहे कीं नाहीं, हें प्रथम पाहिलें जातें. असो, खोली लोटण्याची परीक्षा दिल्यावर बुकरचें नांव शाळेंत दाखल करण्यांत आलें.

---

# प्रकरण ५ वें.



## हाम्पटनच्या शाळेंतील शिक्षण.

हाम्पटनच्या शिक्षण संस्थेचे चालक जनरल आर्मस्ट्रांग हे अत्यंत थोर दर्जाचे पुरुष होते. ते जातीनें गोरे होते, तरी निग्रो

लोकांविषयीं त्यांना अत्यंत सहानुभूति वाटत होती. ‘ जे कां रंजले गांजले ’ त्यांसी आपुले म्हणणारे ते साधुपुरुष होते. त्यांचे-मुळेंच हाम्पटनच्या शाळेस पावित्र्य आलेलें होतें. विद्यार्थ्यांवर त्यांचें अत्यंत प्रेम असे. आपल्या मायाळू पित्याची आठवण आर्मस्ट्रांगचे सहवासांत विद्यार्थ्यांना होत असे. जनरल आर्मस्ट्रां-गच्या सहवासाचें वर्णन करीत असता एकदां बुकर टी. वाशिंग्टन यांनीं असें उद्गार काढले आहेत कीं, “ पुस्तकें आणि मौल्यवान उपकरणें यांच्यापासून मिळणाऱ्या शिक्षणाची किंमत साधुपुरुषांच्या समागमानें मिळणाऱ्या शिक्षणाचे पुढें कांहींच नाहीं.” बुकर टी. वाशिंग्टन यांना जो इतका थोरपणा पुढें मिळवितां आला, त्याचें सर्व श्रेय जनरल आर्मस्ट्रांग यांनाच दिलें पाहिजे. त्यांच्या उदार शिक्षणाचा परिणाम बुकरवर झाला. आपल्या आयुष्यांतील प्रत्येक क्षण परहितार्थ घालविण्याचा धडा आर्मस्ट्रांग यांचेपासून-च बुकर शिकला.

जनरल आर्मस्ट्रांगच्या शाळेंत शिक्षण कशा प्रकारचें दिलें जात असे, याचें अनुमान बुकरच्या प्रवेशपरीक्षेवरून कळून येण्यासारखें आहे. या शाळेंत पुस्तकीपेक्षां धंदेशिक्षणाकडे जास्त लक्ष दिलें जात असे. ज्या शिक्षणानें स्वतःचें व स्वतः-च्या कुटुंबाचें पोषण करतां येईल आणि प्रसंगीं दुसऱ्यास मद-तही करतां येईल असलें शिक्षण तेथें मिळे. या शाळेंतील विद्यार्थी स्वावलंबी बनत. सतत उद्योग करण्याचें त्यांच्या आंग-वळणीं पडे आणि नसता डामडौल मिरविण्याची दुर्बुद्धि त्यांना शिवत नसे. सारांश, लोकांच्या खऱ्या गरजा भागविणारें शिक्षण तेथें मिळत असे.

बुकर हा अत्यंत गरीब मुलगा आहे. पण त्याला शिक्षणाचें

महत्त्व फार वाटतें हें कळून आल्यावर मिस् मेरी मेकीबाईनीं त्यास शाळेच्या द्वाररक्षकाचें काम दिलें. हें काम मोठ्या त्रासाचें व श्रमाचें होतें. पण तें केल्यानें भोजनखर्च भागण्यासारखा होता, म्हणून बुकरनें तें आनंदानें पत्करलें. रात्रौ पुष्कळ वेळपर्यंत हें काम करूनही त्यास विस्तव पेटविण्यास व आपले धडे तयार करण्यास पहांटे चार वाजतां उठावे लागे. पण बुकरचें लहानपणापासून चरित्र पाहिल्यास त्यास हें काम मोठें त्रासदायक होतें असें नाहीं. मिस् मेरी मॅकी या बाईच्यापासूनही बुकरला पुष्कळ तऱ्हेनें साह्य मिळालें.

खेड्यांत व अगदीं गरीबींत आयुष्य घालविलेल्या बुकरला अजून पुष्कळ गोष्टी शिकावयाच्या होत्या. स्वच्छतेनें कसें वागावें, स्नान कसें करावें, दांत कसे साफ करावे, इत्यादि साध्या गोष्टीही त्यास चांगल्या रीतीनें कळत नसत ! त्याच्याजवळ कपडे अगदीं कमी होते. आंगांतील मळके कपडे धुतल्यावर ते वाळत तोंपर्यंत त्यास उघडें बसावें लागे. कपडे जास्त नव्हते खरे, पण होते तेच कपडे तो धुऊन साफ ठेवीत असे. धुतलेले कपडे बहुधा रात्रीं शेगडीच्या उष्णतेनें तो वाळवीत असे.

जनरल आर्मस्ट्रांग यांचे कसोटीस बुकर चांगला उतरला. दरमहा ३५ रुपये तेथील भोजनाचा खर्च असे, तो त्यांनीं त्याला माफ करविला, कारण तो द्वाररक्षकाचें काम चांगलें करीत असें; इतकेंच नव्हे तर मासाच्युटेस प्रांतांतील बेडफर्ड येथील सद्गृहस्थ मिस्टर एच्. ग्रीफीटस यांना सांगून बुकरचा शिक्षणाचा खर्च फीही त्यांजकडून देवविला. हा खर्च दरसाल २४५रुपयांचा असे. भोजन आणि शिक्षण याचा खर्च देण्याची पाळी बुकरवर आली असती, तर त्यास ती शाळा सोडणें भागच होतें. दुसरी

अडचण पुस्तकांची व कपड्यांची होती. बुकरनें आपल्याहून श्रीमंत असलेल्या विद्यार्थ्यांची मर्जी संपादन करून घेऊन त्यांच्यापासून पुस्तकें मागून घेऊन काम भागविलें; आणि त्याच्या शिक्षकांनीं त्याला कपडे पुरविण्याची व्यवस्था केली. उत्तर अमेरिकेंतून या शाळेंतील विद्यार्थ्यांकरितां कांहीं पिंपें भरून कपडे आलेले होते त्यांतील कपडे बुकरला मिळाले. ‘ हिंमत मर्दा तो मदत खुदा ’ ही म्हण बुकरच्या बाबतींत चांगली लागू पडते. मनुष्याला चांगली हिंमत असली, तो खऱ्या कळकळीनें आणि नेटानें उद्योग करीत असला, म्हणजे त्याला परमेश्वराची मदत मिळते हा सिद्धान्त आहे. बुकर आपल्या शाळेंतील सर्व विद्यार्थ्यांत वयानें लहान होता. इतकें लहान वय असतां आपल्या गांवाहून ५०० मैल दूर जाणारे विद्यार्थी कितीसे भेटतील ? बरोबर कोणीं नाहीं, राहण्याची आणि भोजनाचीही सोय नाहीं, ओळख कुठें कोणाची नाहीं, जात अगदीं हलक्या प्रतीची, अशी परिस्थिति असतां बुकरनें शिक्षण संपादण्याकरितां केलेले प्रयत्न पाहिले ह्मणजे आश्चर्य वाटतें, मग अशा हिंमतवान् पुरुषाला परमेश्वराची मदत कां मिळणार नाहीं ?

हाम्पटनची शाळा इतकी लोकप्रिय झाली होती कीं, पुष्कळ विद्यार्थी त्या शाळेंत प्रवेश मिळावा म्हणून धडपड करीत होते. तरी ३००।४०० विद्यार्थी शाळेंत असत. यांत कांहीं ४० वर्षांच्या वयाचेही असत आणि या विद्यार्थ्यांत विद्यार्थिनीही बऱ्याच होत्या. या लोकांची शिक्षणलालसा खरोखर कौतुक करण्यासारखी होती. शाळेंतील शिक्षकही अत्यंत कर्तव्यतत्पर असत. ते पाहिजे त्यावेळीं विद्यार्थ्यांसाठीं एकसारखे खपत असत. विद्यार्थ्यांना मदत करण्याची संधि मिळाली म्हणजे त्यांना आनंद

वाटत असे. या शिक्षकांना विद्यार्थी देवमाणसें समजत. जनरल आर्मस्ट्रांग यांना तर ते ईश्वरी अवतारच मानीत. त्यांना खूष ठेवण्याची संधि येईल, तितकी ते दवडीत नसत. एकदां नवीन आलेल्या विद्यार्थ्यांची सोय लागलेली नव्हती ह्मणून कांहीं खोल्या त्यांना रिकाम्या हव्या होत्या. जनरल आर्मस्ट्रांगचा हा हेतु जाणतांच बुकर वगैरे कांहीं विद्यार्थ्यांनीं आपल्या खोल्या त्यांना रिकाम्या करून दिल्या व ते बाहेर पटांगणांत एक तंबू होता त्यांत राहिले. दिवस कडक हिंवाळ्याचे त्यामुळें रात्रींच्या वेळीं ह्या विद्यार्थ्यांना अत्यंत त्रास झाला. कारण वाऱ्यानें तंबू कोलमडून पडला व रातभर त्यांना कुडकुडत बसून जागरण करावें लागलें. पण आपण दुसऱ्याच्या उपयोगीं पडलों, या भावनेनेंच त्या विद्यार्थ्यांना या त्रासाचें कांहीं वाटलें नाहीं!

एक वर्षभर अशा रीतीनें गेल्यावर उन्हाळ्याची सुटी आली. सर्व विद्यार्थी व शिक्षक आपआपले घरीं गेले; पण बुकरला घरीं कसें जातां येणार? खर्चाला पैसे कोठचे आणावयाचे? शिवाय सुटी लागली, त्या वेळीं त्याला संस्थेचें १६ डॉलर देणें होतें. म्हणून घरीं न जातां कुठें तरी मोलमजुरी करून पोट भरावें आणि संस्थेचें कर्जही फेडावें असें त्याच्या मनांत होतें. आपल्या इच्छेप्रमाणें नोकरी मिळविण्याचा त्यानें बराच यत्न केला तरी त्याला लवकर यश आलें नाहीं. कांहीं दिवस गेल्यावर फॉर्ट्रेस मनरो येथील फराळाचे दुकानांत त्याला काम मिळालें. भोजनखर्चाला पुरून फारच थोडी शिल्लक उरेल इतकी मजुरी तेथें मिळूं लागली संस्थेचें कर्ज फेडतां यावें म्हणून त्यानें स्वतःचे कपडे स्वतः धुतले. अगदीं जरूरीचे कपडेही अंगावर घातले नाहींत. पण इतकें करूनही १६ डॉलरची भरती झाली नाहीं. फराळाच्या

दुकानांत काम करीत असतां एकदां त्याला १० डॉलरची कोरी करकरीत नवी नोट सांपडली.पण ताबडतोब ती त्यानें धन्याला नेऊन दिली. धन्यानें बक्षीस म्हणून कांहीं दिलें नाहीं. पण बुकर निराश झाला नाहीं.

सुटी संपतांच बुकर संस्थेंत दाखल होण्यास पुन्हां गेला. व संस्थेचे खजिनदार जनरल जे. एफ्. बी. मार्शल यांना त्यानें आपली सर्व स्थिति सांगितली. तेव्हां ते बुकरला ह्मणाले, " संस्थेंत पुन्हां दाखल होण्यास तुला हरकत नाहीं. मिळेल तेव्हां तूं कर्ज फेड. माझा तुझ्यावर विश्वास आहे. " दुसऱ्या वर्षींही खोलीरक्षकाचेंच काम त्यानें पतकरिलें.

हाम्पटनच्या संस्थेंतील शिक्षणामुळें बुकरच्या मनावर जी पहिली गोष्ट बिंबली ती ही कीं, '**स्वार्थत्यागांत खरें सुख असतें !**' 'जे लोक दुसऱ्याकरितां फार मेहनत घेतात, ते सर्वांपेक्षां अधिक सुखी असतात' असें तो म्हणत असे. शाळेंतील शिक्षकांच्या वर्तनक्रमावरून बुकरला हा धडा मिळाला. जनरल आर्मस्ट्रांग तर स्वार्थत्यागाचा पुतळाच होता. त्या महात्म्यानें मरतेसमयीं आपल्या भक्तमंडळींना जें कांहीं कळवून ठेवलें होतें, त्यांत असेंही होतें कीं, "**माझ्या मृत्यूनंतर माझें स्मारक कांहींही करूं नका. माझ्या प्रेतावर तें पुरल्या जागीं कबरही बांधूं नका. फक्त एक दगड पुरा. त्यावर फक्त माझें नांव व जन्ममरणकाल लिहा. जास्त कांहीं लिहूं नका.**" कीर्तीचाही अभिलाष न धरणारा असा महात्मा विरळा !

स्वार्थत्यागाच्या पुढचा धडा बुकरला मिळाला तो 'बायबलचा उपयोग कसा करावा' हा होय. आपल्या आध्यात्मिक

उन्नतिसाठीं बायबल वाचणें अत्यंत महत्त्वाचें आहे असें त्याला वाटूं लागलें. दररोज वाटेल तसलें काम असलें तरी बायबलचा एक तरी अध्याय मोठेपणींही आमरण बुकर टी. वाशिंग्टन वाचीत असत. शाळेंत धार्मिक शिक्षण असलें म्हणजे विद्यार्थ्यांवर हा असा परिणाम होतो. 'श्रीमद्भगवद्गीता' हा ग्रंथ अत्यंत थोर दर्जाचा आहे. मग या ग्रंथाचें अध्ययन बुकरच्या कळकळीनें करणें हिंदू विद्यार्थ्यांचें कर्तव्य नाहीं काय ? बुकर टी. **वाशिंगटनच्या चरित्रापासून आपल्या विद्यार्थ्यांना जें जें शिकवितां येण्यासारखें आहे त्यांतच भगवद्गीतेचें रोज निष्ठेनें पारायण करणें ही गोष्टही येते.**

कोंबडीं व बदकें यांची पैदास कशी करावी हेंही या शाळेंत चांगल्या रीतीनें शिकविलें जात असे. ह्या शिक्षणाचा विद्यार्थ्यांना नेहमीं उपयोग होई. पोट भरण्यास अवश्य लागणाऱ्या सर्व धंद्याचें शिक्षण येथें मिळत असे. विटा तयार करणें, सुतारकाम करणें, लोहारकाम करणें, गवंडीकाम करणें ह्या गोष्टी याच शाळेंत निग्रो विद्यार्थी शिकत. व्याख्यान कसें द्यावें हेंसुद्धां पद्धतशीर शिकविलें जाई. मिस् लॉर्ड ह्या बाईनीं बुकरला व्याख्यान कसें द्यावें हें शिकविलें. श्वासोच्छ्वास कसा करावा, वाक्यात जोर कोठें द्यावा आणि स्पष्ट उच्चार कसा करावा, ह्या गोष्टी त्या बाईनीं बुकरला शिकविल्या. व्याख्यानासंबंधानें बुकरनें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, "**खरोखर लोकांसमोर केवळ निरुपयोगी व्याख्यानें देण्याइतकें असमाधानकारक दुसरें कांहीं नाहीं.**" आपल्याइकडील व्याख्यात्यांनीं हें जरूर लक्षांत ठेवावें. हाम्पटनच्या शाळेंत वक्तृत्वोत्तेजक सभा असतात त्यांचाही बुकरला फार उपयोग झाला.

दुसऱ्या वर्षीं सुटी आली तेव्हां बुकरला त्याची आई, बंधु जॉन व कांहीं शिक्षक यांनीं मदत दिल्यामुळें घरीं जातां आलें. घरीं गेल्यावर थोड्याच दिवसांत बुकरची आई वारली. त्यावेळीं त्याला किती वाईट वाटलें असेल, त्याची कल्पना करतां येणें अशक्य आहे. शिवाय जास्त वाईट वाटण्याचें कारण मरतेसमयीं तो आईजवळ नव्हता. हम्पटनला परत जातां येण्याइतके पैसे जमविण्यासाठीं कामधंदा पाहात होता. आपल्या प्रेमळ मातेच्या अंतकाळीं आपण जवळ नव्हतों म्हणूनच त्याला फार वाईट वाटलें. बुकरच्या कुटुंबावर हें मोठें संकट प्राप्त झालें होतें. बुकर व त्याचीं दोन भावंडें यांचे फार हाल झालें. दिवसांतून एकदांहि जेवण मिळण्याची पंचाईत पडूं लागली! अशा स्थितींतही हाम्पटनला जाण्याचा बुकरनें निश्चय केला. याच सुमारास त्यास कोळशाच्या खाणींत काम मिळालें व रफनबाईनींही कांहीं मदत केली. त्यामुळें पुन्हां त्याचें हाम्पटनला जाणें शक्य झालें. वाटखर्चापुरती रक्कम जमतांच त्याला अत्यंत आनंद वाटला. तशांत सुटी संपण्यापूर्वीं तीन आठवडे मिस मेरी यांचेकडून एकाएकीं त्यास पत्र आलें. ‘ इमारती स्वच्छ करण्याच्या कामीं आपणाला मदत करण्यासाठीं जरूर निघून ये’ असें मॅकीबाईनीं बुकरला कळविलें होतें. पत्राप्रमाणें तो ताबडतोब हम्पटनला गेला.

शाळा सुरू होण्यापूर्वीं दोन आठवडे हाम्पटनला जाऊन बुकरनें मॅकी बाईला सर्व प्रकारें मदत केली. यावेळीं तो एक उत्तम धडा शिकला. ‘ हलकी सलकी कामें करण्यांत कमीपणा न मानणें हेंच थोरपणाचें लक्षण आहे ’ हाच तो धडा होय. मिस मॅकीबाई होती, ती कुलीन आणि उच्च घराण्यांतील होती. तरी

निग्रो मुलांसाठीं काढलेल्या शाळेंत ती सर्व प्रकारचें काम करी. खिडक्या स्वच्छ करणें, खोल्या लोटणें, बिछानें झाडून स्वच्छ करणें इ. कामें करण्यांत तिला कांहींच वाटत नसे. स्वतः शाळेंतील शिक्षकच असे श्रम करणारे असले म्हणजे त्याशाळेंतील विद्यार्थ्यांना श्रम करण्याची लाज वाटेल काय ? **श्रमकरणें ही गोष्ट लज्जास्पदच नाहीं. उलट स्वतःच्या श्रमानें आपली उन्नति करून घेणें ही अत्यंत अभिमानाची गोष्ट आहे, हें तत्व बुकरला शाळेंत शिकावयास मिळालें.** आणि शाळेंत मिळालेला हा धडा बुकरनें आजन्म घटविला. श्रमावर प्रेम करण्याची विद्या आमचे देशांतील विद्यार्थी शिकतील काय ? श्रम केल्यानें पैशाचे रूपानें मोबदला मिळतो. एवढ्यासाठीं श्रम करावयाचे नाहींत तर त्यांचेपासून स्वावलंबनाचा धडा मिळतो, आत्मविश्वास वाढतो आणि स्वतंत्रताही मिळते ! परोपकारांत मौज आणि आनंद आहे. ही गोष्ट वरील धड्यापासूनच बुकरला समजली. अशा तऱ्हेचें उच्च शिक्षण महात्मा आर्मस्ट्रांगचे संगतींत मिळवून व हाम्पटनचा अभ्यासक्रम पुरा करून १८७५ सालीं बुकर माल्टनला येण्याला परत फिरला.

———

# प्रकरण ६ वें.



## विद्यार्थ्यांचें कर्तव्य !

विद्या संपादन करणें हें विद्यार्थ्यांचें कर्तव्य आहेच; पण ह्या विद्येचा इतरांना उपयोग होईल असें करणें हेंही विद्यार्थ्यांचें कर्तव्यच आहे. विद्या ह्मणजे ज्ञान आणि अर्थी ह्मणजे मि-

ळविणारा. ज्ञान कशासाठीं मिळवावयाचें तर आपली उन्नति व्हावी म्हणून. अर्थात् विद्यार्थी ह्मणजे आपली उन्नति करून घेणारा मनुष्य. पण आपली उन्नति करावयाची म्हटली तर एका गोष्टीकडे जरूर लक्ष दिलें पाहिजे, ती म्हणजे स्वार्थत्याग. त्याग आणि उन्नति हे शब्द व्यवहारज्ञानाची घमेंड बाळगणाऱ्या माणसाच्या कानाला कसेसेच वाटतील, पण त्याला इलाज नाहीं. दुसऱ्या लोकांस मागें टाकून आपणाला आपली उन्नति कधींही करून घेतां यावयाची नाहीं. दुसऱ्या हजारों लोकांस लुबाडून श्रीमंत झालेले लोक आपली उन्नति झाली असें समजत असतील तर त्यांची चूक आहे. हजारों आत्म्यांचा तळतळाट चालू असतां एका आत्म्याची उन्नति होईल कशी ? एक साधें उदाहरण घेतल्यानेंही जास्त पटेल. चोहोंकडचे ओढे येऊन मिळून सांचलेलें एकादें मोठें तळें आणि अगदीं कमी प्रमाणांतच पण नेहमीं वाहणारा एकादा लहानसा ओढा या दोहोंची तुलना केल्यास कोण श्रेष्ठ ठरेल ? आरंभीं तळ्यांत पाणी जास्त असलेलें दिसेल आणि त्याचें वैभव मोठें आहे असेंही दिसून येईल. पण उन्हाळ्यांत तेंच तळें कोरडे पडलेलें आढळून येईल किंवा त्याचे पाण्यास घाण सुटलेली तरी दिसेल. पण वाहात्या ओढ्याचें तसें नाहीं. तो कमी प्रमाणांत कां होईना सतत वाहात राहील आणि उन्हाळा येईल तसें त्याचें पाणी न बिघडतां उलटें जास्त चवदार होईल ! हा कशाचा परिणाम ? स्वार्थत्यागाचा. तळ्यानें आप्पलपोटेपणानें केवळ पाणी सांठविण्याचाच सपाटा चालविला; त्याचें फळ त्याला भोगावें लागलें. ओढ्यानें प्रत्येक क्षणीं स्वार्थत्याग केला.पाणी सांठवून न ठेवतां तें पुढें जाऊं दिलें.त्याचें गोड फळ त्याला मिळालें. ह्या लहानशा ओढ्यालाही लोक नदी

हें नांव देऊन पवित्र मानतात आणि शेतीकडेही त्याचा पुष्कळ उपयोग होतो. ही गोष्ट थोडी विस्तारानें लिहिण्याचें कारण आपली उन्नति कशानें होते हें विद्यार्थ्यांना कळावें हें होय. श्रीमत् स्वामीरामतीर्थ यांनीं एके ठिकाणीं लिहिलेलें आहे कीं, ' **ज्याला पुष्कळ काळ जगावयाचें आहे, त्यानें ताबडतोब मरावयास तयार झालें पाहिजे.** ' सत्याकरितां प्राण देणारे महात्मे आज अमर झालेले म्हणजे कीर्तिरूपानें जिवंत राहिलेले आपण पाहात आहोंतच. सारांश, स्वार्थत्यागाशिवाय उन्नति होणें शक्य नाहीं. ह्मणून विद्यार्थ्यांचे विद्या संपादनाबरोबरच दुसरें आणि महत्त्वाचें कर्तव्य म्हणजे आपल्या विद्येचा दुसऱ्या-करितां उपयोग करणें. दुसऱ्यांस ती विद्या देणें, हें होय.

बुकर टी. वाशिंग्टन हा अशाच प्रकारचा विद्यार्थी झाला आणि ह्मणूनच त्याला एक ' नमुनेदार विद्यार्थी ' ह्मणून मीं माझ्या बाळमित्रांचे पुढें उभा केलेला आहे. बुकरनें किती प्रया-सानें विद्या संपादन केली हें त्याच्या आतांपर्यंतच्या चरित्रावरून कळून आलें असेलच. इतक्या हालअपेष्टा सोसून मिळविलेल्या ज्ञानाचा उपयोग जर त्यानें आपल्यापुरताच, आपली एक-ट्याची उन्नति करून घेण्यांतच केला असता, तर त्याची किंमत कवडीमोल झाली असती. अमेरिकेंत जन्मलेल्या एका निग्रो जातीच्या विद्यार्थ्याचें चरित्र हिंदुस्थानांतलि विद्यार्थ्यांना मी आज सांगत आहें, तें केवळ बुकरच्या स्वार्थत्यागाला मोहीत होऊनच. त्याच्यासारखे स्वार्थत्यागी लोक ज्या राष्ट्रांत उत्पन्न होतील, त्या राष्ट्राची भरभराट झालीच पाहिजे. एक बुकर जन्मला—केवळ एकच महात्मा लाभला. पण तेवढ्यानें सर्व निग्रो लोकांचें कल्याण झालें ! महात्मा आर्मस्ट्रांगच्या तालमींत तयार

झालेल्या एका पट्टशिष्यानें त्याचें नांव राखलें ! आपल्या जातीसाठीं स्वार्थत्याग करणारा बुकरसारखा एकच मनुष्य जन्माला येऊं द्या कीं, आज हजारों वर्षें नीच मानला गेलेला अस्पृश्य समाज एका क्षणांत स्पृश्य ठरेल !

---

# प्रकरण ७ वें,



## हाम्पटन सुटल्यावर.

शिक्षण पुरें झाल्यावर माल्डनकडे यावयास निघतांना वाटेंत एका भोजनगृहांत खिदमतगाराची नोकरी बुकरनें धरली. ही नोकरी माहितगार माणसाशिवाय दुसऱ्याला बरोबर बजावतां येत नाहीं. भोजनगृहांत जेवावयास येणाऱ्या माणसांची पूसतपास करून त्यांना लागणारें सर्व सामान मिळवून देण्याचें काम खिदमतगार किंवा हुजऱ्या याचें असतें. हें काम बुकरला साधलें नाहीं. म्हणून त्याला ताटें ने आण करणाऱ्या गड्याचें काम करावें लागलें. पण बुकर दृढनिश्चयी होता. त्यानें प्रयत्न करून एक आठवड्याच्या आंत खिदमतगाराच्या नोकरीची माहिती मिळविली व परत आपली जागाही मिळविली ! या भोजनगृहांत नोकरी करून कांहीं पैसे मिळविल्यावर तो आपल्या गांवीं माल्डनला गेला.

माल्डन एथें यावेळीं काळ्या लोकांसाठीं अर्थात् निग्रोसाठीं एक शाळा निघाली होती, तींत त्याला शिक्षक नेमण्यांत आलें. सकाळीं ८ वाजल्यापासून रात्रीं दहा वाजेपर्यंत तो शिकवीत

असे. पुस्तकी ज्ञानानेंच आपल्या जातीची उन्नति होणार नाहीं, हें त्याला माहीत होतें. म्हणून स्नान कसें करावें, ब्रशानें दांत कसे घासावे, कपडे कसे स्वच्छ ठेवावे, केस कसे विंचरावें इत्यादि साध्या गोष्टीही त्यास विद्यार्थ्यांना शिकवाव्या लागल्या. शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या फार वाढल्यामुळें प्रौढ स्त्रीपुरुषांसाठीं त्यानें रात्रीची शाळा सुरू केली. या शाळेत ५०।६० वर्षांचे स्त्रीपुरुषही येत, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. दिवसां आणि रात्रीं आपल्या गांवच्या शाळा चालवून दर रविवारीं आपल्या गांवापासून तीन मैलांवर असलेल्या एका गांवीं बुकर शिकवावयास जात असे. वाटेल तें होवो पण आपली जात सारी शिकून तयार झाली पाहिजे असें त्याला वाटत होतें आणि त्यासाठीं स्वतःला येत होतें, ते इतरांना शिकविण्याला तो नेहमीं तयार असे.

हाम्पटन एथील शिक्षणाचा लाभ बुकरला झाला. त्यावेळीं मदत करणारीं जीं माणसें भेटलीं, त्यांत त्याचा वडील बंधु जॉन हा प्रमुख होता. म्हणून हाम्पटनहून आपण परत आल्यावर आपल्या भावास तेथें पाठविण्याचें बुकरनें ठरविलें. या कामीं त्यास यश आलें. लवकरच जॉन हा तेथील शिक्षण घेऊन परत येऊन त्याला मदत करूं लागला. त्याचा दत्तक बंधू एक गेम्स म्हणून होता. त्याला जॉनचे नंतर हाम्टपनला पाठविण्यांत आलें. तोही यशस्वी होऊन त्यास येऊन साह्य करूं लागला. माल्डनला बुकरनें एक वाचनालय व एक वादविवादसभाही स्थापन करून चालविली.

इ० स० १८७६ ते १८७८ पर्यंत माल्डनला याप्रमाणें काम केल्यावर १८७८ सालच्या शरद्दतूंत वाशिंग्टन येथील

( कोलंबिया प्रांतांतील वाशिंग्टन शहर) शिक्षणसंस्थेंत ८ महिने बुकरनें अभ्यास केला. वाशिंग्टनचे शाळेंत फक्त वाङ्मयविषयकच शिक्षण मिळत असे. त्यामुळें हाम्पटन आणि वाशिंग्टन एथील संस्थांची तुलना करण्याची संधि त्याला मिळाली व पुढें त्यानें शाळा सुरू केली, त्यावेळीं धोरण ठरविण्यास ही गोष्ट फार उपयोगीं पडली. या वाशिंग्टनच्या संस्थेंत शिकलेल्या विद्यार्थ्यांस झकपक पोषाख करून चैनीनें राहावें व उद्योग कांहीं न करतां पैसे मिळवावे असे वाटे. हलकें सलकें काम करणें तर त्यांना अत्यंत लज्जास्पद वाटे. अर्थात् ही शिक्षणपद्धति बुकरला पसंत पडली नाहीं.

वाशिंग्टनला असतां माल्डनभागांत राहाणाऱ्या गोऱ्या लोकांच्या पंचकमेटीकडून त्यास आमंत्रण आलें. त्यावेळीं वेस्ट व्हर्जिनिया प्रांताची राजधानी बदलावयाची होती. माल्डनपासून ५ मैलांवरचें चार्ल्स्टन हें गांवही या कामीं निवडून येण्यासारखें होतें. गोऱ्या लोकांकडून आपल्या भागांत हिंडून व्याख्यान देऊन जास्त मतें चार्ल्स्टन गांवाला मिळवून देण्याबद्दल बुकरला विनंती करण्यांत आली. या विनंतीस मान देऊन त्यानें दोनतीन महिने व्याख्यानें दिलीं व त्यांत त्याला यशही आलें. याचसाठीं आर्मस्ट्रांगचेकडून बुकरला एक पत्र आलें, व हाम्पटनसंस्थेच्या ग्रॅज्युएट विद्यार्थ्यांना पदवीदानसमारंभाचे वेळीं उपदेश करण्यास येण्याबद्दल त्याला कळविलें. बुकरला अत्यंत आनंद झाला व त्याप्रमाणें त्यानें हाम्पटनला जाऊन तें काम पार पाडलें. ज्या शाळेंत २।३ वर्षांपूर्वीं विद्यार्थी ह्मणून शिक्षण घेतलें, त्याच शाळेंतील विद्यार्थ्यांना इतक्या थोड्या मुदतींत पदवीदान समारंभाचे वेळीं उपदेश करावयास जाणें ही

किती अभिमानास्पद गोष्ट आहे ! असला मान मिळण्यास कर्तबगारीही तशीच पाहिजे. बुकरची योग्यता आर्मस्ट्रांग-यांनीं पूर्ण ओळखलेली होती, म्हणूनच त्याला त्यांनीं या कामास बोलाविलें.

हाम्पटनहून परत आल्यावर इ० स० १८७९ त हाम्पट-नला पुन्हां परत येण्याबद्दल जनरल आर्मस्ट्रांगचें पत्र आलें. त्या-प्रमाणें बुकर परत गेला. तेथें त्याजकडे रेडइंडियन नांवाच्या रानटी लोकांना शिक्षण देण्याचें काम सोंपविण्यांत आलें. हें काम फार अवघड होतें. इंडियन लोक आपणांला निग्रो लोकांपेक्षां श्रेष्ठ समजत. त्यामुळें त्यांच्यात राहून त्यांना आपलेसें करून घेणें बुकरला फार जड गेलें. पण या कामींहि त्यानें यश मिळविलें. 'दुसऱ्याची उन्नति करण्याला आपण जेवढें साह्य करतों तेवढीच आपली उन्नति होते.' हें तत्व बुकरला पटलें असल्यामुळें त्यानें रेडइंडियन लोकांच्यासाठीं फार मेहनत घेतली. त्यांना खूष ठेऊनच त्यांचेकडून काम करून घेतलें.

रेडइंडियन विद्यार्थ्यांची शाळा एक वर्षभर चांगल्या रीतीनें चालवून दाखविल्यावर हाम्पटनएथील रात्रीची शाळा बुकर टी. वाशिंग्टनकडे आर्मस्ट्रांग यांनीं सोंपविली. दिवसां काबाड-कष्ट करणारे विद्यार्थी रात्रीं या शाळेंत शिक्षण घेत. बुकरनें शाळा सुरू केली, तेव्हां १२ विद्यार्थी दाखल झालें. पण ही शाळाही त्यानें अत्यंत यशस्वी करून दाखविली. एकदां जी चांगली घडी बसली ती बसली. हल्लीं ती शाळा अमेरिकेंत सुरू असून सुमारें ४०० विद्यार्थी तींत शिक्षण घेत आहेत.

याप्रमाणें ह्या शाळेवर एक वर्षभर काम केल्यावर बुकरनें हाम्पटन सोडलें. आलाबासा संस्थानांतील टस्केजी एथें एक

काळ्या लोकांसाठीं शाळा उघडावयाची आहे तिच्यासाठीं एक शिक्षक पाहिजे म्हणून तेथील लोकांचें जनरल आर्मस्ट्रांग यांना एक पत्र आलें व त्याप्रमाणें या कामीं बुकरची त्यांनीं निवड करून त्याला तिकडे पाठविलें. एथून पुढें आपली कर्तबगारी दाखविण्याची खरी संधी त्याला प्राप्त झाली व तिचा त्यानें उत्तम उपयोग करून घेतला.



# प्रकरण ८ वे,



## टस्केजीची शाळा.

जनरल आर्मस्ट्रांगचे आज्ञेवरून बुकर टी. वाशिंग्टन यांनीं टस्केजीस येऊन शाळा सुरू केली. टस्केजी हें गांव काळ्या लोकांचे वस्तीचे मध्यस्थानीं होतें.येथें येतांच बुकर टी. वाशिंग्टन यांस अनेक अडचणी दिसू लागल्या. शाळेस लागणारीं साधनें कांहींच तयार नव्हतीं. इमारत सुद्धां नव्हती. पण निराशा ज्याचे चित्तास कधींच शिवली नाहीं त्या गृहस्थास याचें नवल वाटलें नाहीं. वाशिंग्टनचे सुदैवानें शिक्षणासाठीं हपापलेले लोक मात्र पुष्कळ तयार होते. लोकांची स्थिति विचार करण्यासारखी होती. आपल्याइकडे मुंबईसारख्या शहरांतून मजूर लोकांची जी दिसून येते, तसलीच स्थिति या लोकांची आढळून आली. लोक कर्जबाजारी होते. पण नसत्या श्रीमंतीची ऐट मिरविण्याची हौस मात्र त्यांच्यांत फार दिसून येत होती. घरांत एकाद्या वेळीं उपास काढण्याची पाळी. पण घड्याळें, बाजाच्या पेट्या, शिलाईचीं

यंत्रें वगैरे साधनें विकत घेऊन ठेवण्याची हौस दांडगी ! शनिवारीं शहरांत अर्धा दिवस घालवून चैन करण्याकडे प्रवृत्ति फार ! अशा लोकांना शिकविण्यासाठीं वाशिंग्टनची योजना झालेली होती. पण गुरुजी खरोखर लायक होते. त्यांनीं टस्केजीस येतांच महिनाभर खेड्यापाड्यांत हिंडून आपल्या लोकांची स्थिति प्रत्यक्ष पाहिली व त्यांच्या स्वभावाचें, आवडीनिवडीचें बारकाईनें निरीक्षण केलें आणि त्यास अनुसरूनच आपल्या शिक्षणाची दिशा ठरविली.

इ० स० १८८१ च्या जुलईच्या ४ थ्या तारखेस शाळा उघडण्यात आली. विद्यार्थी व विद्यार्थीनी मिळून ३० लोक होते. या विद्यार्थ्यात कांहीं १०।४० वर्षांच्या वयाचेही होते. या शाळेस टस्केजीच्या कांहीं गोऱ्या लोकांनींही मदत केली. शाळेस सुरवात एका खुराड्यांत ( कोंबड्या पाळण्याच्या घरांत ) झाली. ही इमारत लहान तर होतीच पण पडकीही होती ! पाऊस पडूं लागला म्हणजे विद्यार्थी शिक्षकावर छत्री धरीत. गांवांत एक चर्च ( प्रार्थनामंदिर ) होतें, तेंही असेंच पडकें होतें.

केवळ बौद्धिक शिक्षण देण्यानें खरें शिक्षण होत नाहीं. व इतर व्यवहाराचें शिक्षणही विद्यार्थ्यांना दिलें पाहिजे हें बुकर टी. वाशिंग्टन यांना चांगलें कळून आलें होतें, म्हणून त्या धोरणानें च त्यांनीं आपल्या शाळेंतील शिक्षणक्रमास सुरवात केली. शाळेसाठीं इमारती बांधणें इतर उपकरणें मिळविणें इत्यादि गोष्टी त्यांनीं विद्यार्थ्यांकडूनच करून घेतल्या. गवंडी काम, सुतार काम इ० धंदे प्रत्यक्ष विद्यार्थ्यांना करण्याची संधि देऊनच शिकविले. विटा घालण्याचा कारखानाही शाळेस जोडून सुरू केला. सारांश विद्यार्थ्यांच्या गरजा भागविणारें शिक्षण या शाळेंत सुरू झालें.

त्यामुळें चैनीकडे प्रवृत्ति असलेल्या लोकांना तें आरंभीं आवडलें नाहीं. पण एकंदरींत सर्व लोकांना तें लवकरच पसंत पडल व या शाळेकडे लोकांचें चित्त आकर्षिलें गेलें. पहिल्या महिन्याचे अखेरीस शाळेंत ५० मुलें झालीं. लवकरच वाशिंग्टन यांस मिस् ऑलिव्हिआ ए. डेव्हिडसन या नांवाची एक अध्यापिका येऊन मिळाली. हिची मदत या शाळेला अत्यंत झाली. हीच स्त्री पुढें वाशिंग्टनची पत्नि झाली.

पुढें बुकर टी वाशिंग्टन यांनीं ५०० डॉलरला एक मळा विकत घेतला. त्याचे २५० डॉलर रोख दिले व २५० एक वर्षानें देण्याचा करार केला. या मळ्यांतील जमीन विद्यार्थ्यांनींच साफ सूफ केली. सुरवात स्वतः बुकर टी वाशिंग्टन यांनींच केली. मळ्यांतील एक दोन इमारती ही विद्यार्थ्यांनींच झाडून स्वच्छ केल्या. बौद्धिक शिक्षणाबरोबरच हें असलें व्यावहारीक शिक्षण मिळाल्या मुळें, स्वतःच्या पायावर उभें राहण्याची हिंमत विद्यार्थ्यांत खास उत्पन्न होते. वाशिंग्टननें आपल्या भावी पत्नीच्या मदतीनें जत्रा भरविण्याची एक नवीन टूम काढली. टस्केजी गांवांत आणि आसपास हिंडून त्यांनीं लोकांकडून व्यवहारोपयोगी पदार्थ आपल्या शाळेस मदत म्हणून मागून आणले व तें जत्रेंतील बाजारांत विकून पैसे मिळविले. अशा रीतीनें कांहीं पैसे जमवून हाम्पटन संस्थेचे खजिनदार जनरल जे. एफ बी. मार्शल यांचे कडून कांहीं उसनवार आणून मळ्याची निमी किंमत भागविण्यांत आली,

शाळा चांगली आहे असा लोकांचा समज होत चालला तसतशी शाळेला गोरगरीबांकडूनही मदत मिळूं लागली, कांहीं गरीब निग्रोंनीं फाटकी चादर, ऊस इ. जिन्नस देऊन आपले

शाळेविषयींचें प्रेम व्यक्त केलें- एका सत्तर वर्षांच्या म्हातारीनें वाशिंग्टनकडे येऊन बाळा, " तूं आपल्या जाती साठीं झटतोस तें बघून मला फार आनंद वाटतो. तुला मदत करण्याला माझ्याजवळ कांहीं नाहीं पण बरेच दिवस काटकसर करून ६ अंडीं जमविलेलीं आहेत हीं तुला देते, घे. नाहीं म्हणू नकोस, " असें म्हणाली ! खेड्यांपड्यांतल्या अगदीं सामान्य लोकांचें लक्ष वेधून घेणारी शाळा खरोखरच तशा योग्यतेची असली पाहिजे यांत शंका नाहीं.

परोपकाराचें व्रत विद्यार्थ्यांनीं स्वीकारावें ह्मणून ही वाशिंग्टन यांनीं फार परिश्रम केले. विद्यार्थीही लवकरच गुरुजींचें अनुकरण करणारे बनले. एका सुटींत विद्यार्थ्यांनीं एका गरीब ह्मातान्याची एक झोपडी बांधून दिली. ' अडल्यास हात देण्याची संधि, ते वाया दवडीत नसत.

या शाळेतील विद्यार्थी हळूहळू सर्व कामाधंद्यांत तरबेज झाले इमरती बांधणें; विटा तयार करणें; गाड्या, खटारे बग्या तयार करणें; खाटा व चटया तयार करणें इ. सर्व कांहीं त्यांचे ते तयार करूं लागले. जगाला कशाची गरज आहे तें पाहून ती गरज भागविण्याचा यत्न आपण केला तर व्यापारी दृष्ट्या यश अवश्य येईल असें वाशिंग्टनचें ह्मणणें होतें आणि तें खरेंही होतें. शेती करण्यातही निग्रो विद्यार्थी लवकरच हुषार झाले. या विद्यार्थ्यांचें अनुकरण करूनच शेजारच्या गांवांतलि शेतकरीही शेतींत सुधारणा करूं लागले,

शाळा सुरू झाल्यावर जनरल आर्मस्ट्रांग, मिस मॅकी, जनरल मार्शल वगैरे थोर पुरुषांनीं या शाळेस भेट दिली, **निस्वार्थ बुद्धीनें काम करणान्या मनुष्याचा बोजा परमेश्वरावर**

पडतो व परमेश्वर ऋणे फेडल्याशिवाय रहात नाहीं, हें श्री स्वामी रामतीर्थ यांचें वचन या शाळेच्या बाबतींतही खरं ठरलें. बुकर टी. वाशिंग्टन यांच्या या कामास पुढें मोठमोठ्या लोकांनीं मदत केली व हल्लीं ती संस्था अत्यंत नमुनेदार संस्था बनलेली आहे. आरंभी बुकर टी. वाशिंग्टनला किती अडचणीशीं झगडावें लागले व त्यानीं कशा परिस्थितींत शाळा सुरू केली हें हल्लींची संस्थेची स्थिति पाहाणाराला सांगितले तर खरेंही वाटणार नाहीं. बुकर टी. वाशिंग्टन ह्मणत असत कीं, मनुष्याची योग्यता त्यानें केलेल्या कामावरून ठरवितां त्याला किती अडचणींशीं-झगडावें लागलें यावरूनच ठरवावी ? हें म्हणणें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

या शाळेंत आरंभीं फक्त एकच जनावर होतें. हें जनावर म्हणजे टस्केजी एथील गोऱ्या नागरिकानें दिलेला एक आंधळा घोडा, हें होय. हल्लीं ( १९१२ सालीं या संस्थेंत दोनशें घोडे, शिंगरें, खेचरें, गाई, वासरें, बैल व सुमारें ७०० डुकरें आणि याशिवाय बऱ्याच मेंढ्या व बकरीं आहेत. हल्लीं या शाळेंत निरनिराळे ४० धंदे शिकविले जातात. सर्व शिक्षक निग्रोच असून शिक्षण मोफत दिलें जातें. १९०८–१९०९ सालीं या शाळेंत १४९४ विद्यार्थी शिकत असून १६७ शिक्षक होते. शाळेला जोडून मोठमोठीं शेतें असून त्यांत शेतीचे व बागाइतीचे प्रयोग करून विद्यार्थ्यांना शेतकीचें व बागाइतीचे प्रत्यक्ष शिक्षण देण्यांत येतें. १९०९ सालीं शाळेच्या मालकीची २३४५ एकर जमीन होती. पैकीं १००० एकर शेतीची जमीन होती, ११४५ एकर कुरणें व जंगल मिळून होती, व २०० एकर शाळेकडे होती. १९०९ सालीं शाळेला

मिळालेल्या निरनिराळ्या देणग्यांची रक्कम ४८६३६०० रुपये असून शाळेची मालमत्ता ३९११८१० रुपयांची होती. शाळेच्या निरनिराळ्या १०० इमारती असून त्यांचे नकाशे व बांधकाम शाळेंतील शिक्षक व विद्यार्थी यांनींच केलेलें आहे. इमारतीच्या विटा सुद्धां विद्यार्थ्यांकडून तयार करण्यांत आलेल्या आहेत. शाळेला स्लेटर निधींतून दरसाल ३५००० रुपये मिळत असून तितकेच डालर सरकारांतून मिळत असतात. १९१२ सालीं १६१२ वर विद्यार्थी, २०० शिक्षक व इतर आफिसर होते व संस्थेच्या इमारती १४० होत्या.

वरील हकीकत वाचून टस्केजी शाळा हल्लीं कोणत्या स्थितींत असेल याची कांहीं तरी कल्पना येईल अशी खात्री आहे. ज्या महात्म्याच्या कर्तबगारीचें हें फळ आहे, त्याचें चरित्र 'एक नमुनेदार विद्यार्थी' म्हणून आपल्या देशांतील विद्यार्थ्यांनीं शिकावयास नको काय ?

" हल्लीं टस्केजीच्या शाळेंतील एक प्रो० मि० कार्व्हर हे अत्यंत प्रसिद्धीस आलेले आहेत. ते जातीनें निग्रोच आहेत; तथापि आपल्या कल्पकतेनें आणि बुद्धिसामर्थ्यानें गोऱ्या लोकांनाहीं त्यांनीं खालीं पाहावयास लावलें आहे. ' सामान्य धान्यापासून नाना प्रकारचे उपयुक्त पदार्थ निर्माण करण्यांत हे प्रोफेसर प्रति विश्वकर्मा आहेत ! ' त्यांनीं शुल्लक मातीपासून नाना प्रकारचे रंग तयार केलेले आहेत ! ! साधा बटाटा—आपलें रताळूं याचेपासून निरनिराळ्या तऱ्हेचे ११२ पदार्थ त्यांनीं तयार केले आहेत ! ! आपला नेहमींचा उपयोगी पदार्थ शेंगदाणा, याचेपासूनही त्यांनीं ११० पदार्थ निर्माण केले आहेत ! ! ! प्रो० कार्व्हरसाहेब म्हणतात कीं, जगांत फक्त शेंगदाणा व रताळूं

शिल्लक राहील तर तेवढ्यावर मनुष्यजातीला नाना प्रकारचीं पक्वान्नें करून खातां येतील ! ”

( किर्लोस्कर खबर वर्ष ३ रें अंक ५ वरून थोडा फेर करून ).

---

## प्रकरण ९ वें.



### नराचा नारायण !

‘ मनुष्य कर्तबगार असला तर तो आपल्या कर्तबगारीनें परमेश्वर सुद्धां होऊं शकेल, ( नर करणी करेगा तो नर का नारायण हो जायगा ) हें बुकर टी. वाशिंग्टनच्या चरित्रानें चांगलें सिद्ध झालेलें आहे. लहानपणची बुकरची परिस्थिति माहीत असणाराला तो पुढें इतका कर्तबगार आणि कीर्तिमान् होईल असें कालत्रयीं वाटणें शक्य नाहीं. बुकरसारख्या नीच स्थितींतिल मनुष्य इतक्या उच्च स्थितीस पोहोंचूं शकेल असें मानवी मनाला पटणें देखील शक्य नाहीं. पण जगाची काळजी वाहणाऱ्या परमेश्वराला कर्तबगार माणसाची काळजी अधिक वाहावी लागते. रत्नपारखी माणसें रत्नें चिखलांत पडलेलीं असलीं, तरी तीं वर काढून झकपक करून जगाच्या बाजारांत मांडतात, त्याचप्रमाणें परमेश्वरही नररत्नाला–वाटेल तसल्या नीच स्थितींत तें असूं द्या जगाच्या बाजारांत मांडून त्याची लायकी जगाच्या निदर्शनास आणून देतो. पुष्कळ माणसें परिस्थितीची सबब सांगून स्वस्थ बसतात. पण थोर माणसें परिस्थितीलाच बदलून टाकतात ! बुकर टी. वाशिंग्टनचें चरित्र वाचणाराला ‘ जगांत अशक्य असें कांहींच नाहीं ’ हें नेपोलियन बोनापार्ट याचें ह्मणणें तेव्हांच पटेल.

## एक नमुनेदार विद्यार्थी.

टस्केजीची शाळा लोकोपयोगी आहे असें जेव्हां थोर थोर माणसांना दिसून येऊं लागलें, तेव्हां त्यांनीं वाशिंग्टनला सर्वपरी मदत केली. व त्यामुळें हल्लीं जगाला आश्चर्य करावयास लावणारी ती शाळा झालेली आहे. उगीच बडबड करून कांहीं न करणाराला कोणाकडूनही कांहीं मदत मिळत नाहीं. पण अंतःकरणपूर्वक जर एकाद्यानें कांहीं केलें मग तो त्या बाबतींत मुळींच बडबडला नाहीं तरी चालेल—तर त्याचें चीज केल्याशिवाय लोक सोडीत नाहींत. वाशिंग्टनला त्याचे भाऊ, मित्र व देशांतील श्रीमान गृहस्थ यांजकडून त्याची कर्तबगारी दिसूं लागल्यावर चांगली मदत झाली.

टस्केजी संस्था भरभराटीस येत चालली, तसतसें बुकर टी. वाशिंग्टन या व्यक्तीकडे लोकांचें लक्ष लागलें. काळे आणि पुष्कळ गोरे लोकही त्याला मेजवानी देण्याचे निमित्तानें आपले घरीं पायधूळ झाडण्यास बोलावूं लागलें ! हाम्पटनला शिकावयास जात असतां ज्या हाटेलांत बुकरला उभें राहण्यालाही मज्जाव झाला, त्याच हॉटेलांत मेजवानी घेण्याचे त्याला प्रसंग कितीं तरी वेळां आले ! ज्या हॉटेलांत बुकरनें खिदमतगाराची नोकरी पतकरली होती त्याच हाटेलाचे मालकानें आग्रहानें बोलावून बुकरचें स्वागत केलें ! ज्या रिचमंडशहरांत तो दोन दिवस उपाशीं होता, त्याच शहरच्या बड्या बड्या लोकांनीं पाहुणा म्हणून त्याचें आतिथ्य केलें ! आणि ज्या रस्त्याच्या बाजूला उंचवट्याखालीं दोन रात्रीं त्याला झोपून काढाव्या लागल्या, त्याच रस्त्यावरून मोटारींत बसून जाण्याचे प्रसंग त्याला कैक वेळां आले ! आठवड्यांतून एक वेळ काकवी मिळाली म्हणून धन्यता मानणाऱ्या बुकरला रोज

भोजनाचीं आणि तींहि पक्वान्नाच्या भोजनाचीं आमंत्रणें येऊं लागलीं! वयाच्या सहाव्या वर्षीं एक साधी टोपी मिळाली म्हणून हर्षभरीत होऊन गेलेल्या बुकरला स्वतःलासुद्धां आपण पुढें इतके वैभवसंपन्न होऊं असें खास वाटलें नसेल! माल्डनपासून हाम्पटनचा प्रवास करणें ज्याला अगदीं अशक्य होऊन गेलें होतें आणि वाटेंत कोणींहि विचारपूस न केल्यामुळें ज्याला कित्येक उपास पडले होते, तोच बुकर मोठेपणीं हॉलंड, बेलज्यम, फ्रान्स, इंग्लंड वगैरे देशांतून सुखानें प्रवास करून आला आणि शेंकडों बड्या बड्या लोकांच्या घरीं त्याला मेजवानी मिळाली! इंग्लंडमध्यें असतांना महाराणी व्हिक्टोरिया हिनेंही त्याला आणि त्याचे पत्नीला भेट दिली! अमेरिकेंतील अत्यंत प्रसिद्ध युनिव्हर्सिटी ( विश्वविद्यालय ) म्हणजे हारवर्ड युनिव्हर्सिटी. या युनिव्हर्सिटीनेंही प्रो० बुकर टी. वाशिंग्टन यास मोठ्या प्रेमानें बोलावून आपल्या संस्थेची 'मास्टर ऑफ आर्ट्सची पदवी त्याला दिली! या समारंभास त्या प्रांताचे गव्हर्नरसुद्धां हजर होते. बडेबडे विद्वान् व श्रीमान् गृहस्थ तर सर्व हजर होते. हाम्पटनसंस्थेंत प्रवेश मिळावा म्हणून मिस्–मेरी मॅकी यांचे तोंडाकडे पाहाणाऱ्या व 'खोली झाडून काढून प्रवेश परीक्षा' देणाऱ्या बुकरला हारवर्ड युनिव्हर्सिटीपुढें एम. ए. ही पदवी देणार आहे, हें फक्त त्या सर्वज्ञ परमेश्वरालाच माहीत असेल!

व्याख्याता या नात्यानेंही वाशिंग्टनची योग्यता चांगलीच वाढलेली होती. 'अटलांटा प्रदर्शनांत' जें त्यांचें भाषण झालें त्यानें तर त्याच्या कीर्तिमंदिरावर कळसच चढविला! या भाषणाची स्तुति त्या वेळच्या सर्व वर्तमानपत्रांतून वाचावयास मिळत

होती. अमेरिकेच्या त्या वेळच्या प्रेसिडेंटनें हें भाषण वाचावयास मिळतांच प्रो० वाशिंग्टन यांच्याकडे अभिनंदनपर पत्र पाठविलें होते ! असो. इतक्या उच्च पदास पोहोंचलेला हा महात्मा इ० स० १९१५ सालीं ख्रिस्तवासी झाला.

सारांश, बुकरसारख्या काळ्या नीच आणि हलक्या कुळांत जन्मलेल्या मनुष्याला जेवढा मान मिळावयास हवा होता, तेवढा मिळाला. त्याच्या कर्तबगारीला यश आलें, पण या सर्व यशाची गुरु किल्ली त्याच्या अपूर्व स्वार्थत्यागांत आहे. मोहाचीं कारणें बाजूस सारून इतर कोणत्याही चळवळींत न पडतां पोटास चिमटा घेऊनही आपल्या जातीची उन्नति करण्यांत त्यानें आपलें आयुष्य वेंचलें, हाच त्याचा स्वार्थत्याग होय. तो राजकारणांत पडला असतां तर सहज एकाद्या प्रांताचा गव्हर्नर झाला असतां आणि बडा मुत्सद्दी ह्मणून नांवाजला असता, पण त्याच्या जातीची उन्नति झाली असती काय ? बुकर टी. वाशिंग्टन यांनीं राजकारणांत पडावें म्हणून पुष्कळ लोकांनीं त्यांना आग्रह केला; पण आपल्या जातीचा उद्धार करण्याचें कंकण बांधलेल्या वाशिंग्टननें त्या आग्रहास जुमानलें नाहीं! आमच्या इकडील राजकारणी देशभक्तांनीं ही गोष्ट जरूर लक्षांत ठेवावी.

अत्यंत स्वार्थत्यागी एक माणूससुद्धां काम करूं शकतो, हें वाशिंग्टनचें चरित्र सांगतें, गुलामगिरीनें गांजून गेलेल्या व अत्यंत नीच मानलेल्या निग्रो जातीचा उद्धार करणें हें काम सोपें नव्हें, पण एकट्या बुकर टी. वाशिंग्टननें तें घडवून आणलें. निग्रोप्रमाणेंच आपल्याइकडे अस्पृश्य लोक अगदीं हीन स्थितींत आहेत त्यांचा उद्धारही त्यांच्यांतच एकादां लायक मनुष्य निर्माण झाल्याशिवाय होणें शक्य नाहीं. ज्याचा त्यानेंच उद्धार करून

ध्यावयाचा असतो. इतरांचे हातून तें काम समाधानकारक होत नाहीं. भगवान् श्रीकृष्ण स्वतः मदतीस असतांही त्यांनीं अर्जुनास ' **उद्धरेदात्मनाऽत्मानं नात्मानमवसादयेत्** ' असा उपदेश केला आहे, त्यांतील रहस्यही हेंच. असो.

शेवटीं, ' I am the engine and my Lord is the Driver (मी एंजिन आहे आणि परमेश्वर हा माझा डायव्हर),आहे, या श्रीस्वामी विवेकानंदाचे उक्तीवर माझा विश्वास असल्यामुळें ज्याचे चरणप्रतापानें हें चरित्रपुष्प तयार झालेलें आहे, त्याचेंच चरणीं तें वाहून माझ्या बालमित्राची मी रजा घेतों.

ॐशान्तिः शान्तिः शान्तिः !!!

---

